**घाटी**–रीति, नमुना. **मुद्रा**–वर्णरचनेचा विशिष्ट प्रकार. **छंद**–वृत्त. **भेदाभेद** –निरनिराळे प्रकार. **पद्प्रकार**–शब्दचमत्कार. **प. ७ सृष्टी**–जग. **अलंकार** –भूषण. **शृंगार**–शोभा. **सिद्धींचा**–यशाचा. **निर्धार**–निश्चय. **प. ८ मंडण** –शोभा. **प. ९ रूपकर्ते**–स्वरूपाचा बोध करणारे. **महत्त्ववर्णिते**–मोठेपणा सांगणारे. **वाखाणिती**–वर्णन करतात. **प. १० व्यापार**-कार्य, उद्योग, अर्थात् काव्यरचना. **जगदुद्धार**–जगत्+उद्धार–जगाचा उद्धार, सृष्टीची उन्नति **आधार**–आश्रय. **प. ११ वाल्मीकि**–रामायणाची रचना करणारा ऋषि. ह्याचें पूर्वीचे नांव ' वाल्या कोळी ' असें असून तो वाटमाऱ्याचा धंदा करीत असे. त्यास नारदांनीं रामनामाचा उलटा जप करावयास सांगितल्यानें तो मुक्त झाला, अशी कथा आहे. **प. १२ पैं**–पादपूरणार्थक अव्यय. **प. १३ बृहस्पती** –देवांचा गुरु. **वेदश्रुति**–वेद. **प. १४ वोळलें**–वळले, खाली आले. **रसांचे** –शृंगार, वीर, इत्यादि नऊ रसांचे. **ओघ**–प्रवाह. **प. १५ विवेकनिधि**–विचारसंग्रह. **भांडार**–खजिना. **मनुष्याकारें**–मनुष्याच्या आकाराची. **कोंदाटलें** तुडुंब भरले. **प. १६ तारवें**–नौका, गलबतें. **लोटलीं**–भरून आलीं-**उतटलीं**–कांठोकांठ भरून वर आलीं. **उपेगा**- उपयोगाला. **प्रयोग**-कार्य. **प. १७ पवाड**–स्तव, स्तोत्र. **वाड**–विशाळ. **ब्रह्मांडरचना**–विश्वाची उभारणी. **प. १८ साष्टांग नमस्कार**–आठ अंगे जमिनीस लावून केलेला नमस्कार–दोन गुडघे, २ टांचा, २ हात, १ मस्तक, १ छाती ही आठ अंगें. **भावें**–भक्तिपूर्वक.

## ४. अद्भुत किमयागार. पृ० ५–८.

**प. १ नवमल्लिका**–मोगऱ्याचा एक प्रकार. **कलिका**–कळी. **विकस्वर**–फुललेली, प्रफुल्लित. **आमोद**–सुवास. **किमया**–अद्भुत पदार्थ बनविण्याची शक्ति किंवा सामर्थ्य. तांब्याचें कांहीं प्रयोगानें सुवर्ण बनविणें ह्याला किमया म्हणण्याचा परिपाठ आहे. त्या मूळ शब्दावरून हा व्यापक अर्थाचा शब्द योजला आहे. **दुज्या**–दुसऱ्याला. **साधे**–साध्य होईल. **प. २ वन्य**–रानांतील,जंगली. **तृणविधा**–गवताचे प्रकार. **गो**–गायी, बैल. **महिषी**–म्हशी, रेडे. **अजादिक** –शेळया, मेंढया वगैरे. **दुग्धरूपा**–दुधाचें स्वरूप. **प. ३ पुत्तलिका**–पुतळी. **मसूरदलसी** मसुराच्या डाळीयेवढी. **नांदते**–राहते. **अचाट**–अद्भुत. **ब्रह्मांड**–सारें विश्व. **ग्रासिते**-ग्रहण करते. **सूचि**–सुई. **वारण**–हत्ती. **पं. ४ तुच्छतुच्छ**-अतिशय तुच्छ. **सिंधूदरीं**-सिंधु+उदरीं-समुद्राच्या पोटांत. **प्रवाललतिका**–पोंवळ्याची वेल. हीस वेल म्हणतात तरी, तिचा आकार एखाद्या झुडपासारखा किंवा झाडासारखा असतो, म्हटलें तरी चालेल. **मुक्ताफळ**–मोतीं. **शुक्तिकीटकरस**-शिंपींतील कालवाच्या अंगांतून पाझरणारा

रस. **अग्र्य**-श्रेष्ठ. प. ५ **स्वगर्भी**-आपल्या पोटांत. **सरी**-बरोबरी. **कौशेय**-रेशमीं वस्त्र. **तंतुरूप**-दोऱ्याच्या रूपाचें. **पर्णाशन** पानें खाणारा, किडा. प. ६ **खर**-प्रखर, तीव्र. **कर**-किरण. **चंडांशु**-सूर्य. **क्रांत**-व्याकुळ. **सत्त्व**-प्राणी. **लता**-वेली. **तरु**-वृक्ष. **सुमें**-पुष्पें. **दाटणें**-लगटणें, दाटी करणें. प. ७ **सिंधु** समुद्र. **कटु**-कडू. **गर्ता**-खांच; खळगा. **घाणलें**-घाण असलेलें. दुर्गंधयुक्त. **पंकिल**-( पंक-चिखल ) गढूळ. **थिल्लर**-डबकें. **कूपस्थ**-विहिरींतलें. **शेवाळलें**-शेवाळ वाढलेलें. **खांतुनी**-आकाशांतून ख-आकाश. प. ८ **कंद**-कांदा, मूळ. बीजांतून वृक्ष येतो, हा सामान्य नियम आहे खरा; तथापि कित्येक वृक्षांस मुळीं बीजच नसतें. ते वृक्ष बुंध्यांतून फुटतात. उदाहरणार्थ-विलायती फणस किंवा ज्याला ' ब्रेड ट्री ' म्हणजे भाकरीचें झाड म्हणतात तें. ह्या फळांत बीज नसतें. ह्यास्तव पावसाळ्यांत त्या वृक्षाच्या मुळाला चोचे मारून ठेवावे लागतात. म्हणजे त्यांतून चीक बाहेर येतो व त्याला रोपे फुटतात ! ते काढून लावावे म्हणजे लागतात. **शाखा**-डहाळी; कलमी आंबे डहाळीपासून होतात हें प्रसिद्धच आहे. **स्थाणु**-खुंट. **अंशांकुर**-पेरांतून निघणारे अंकुर. प. ९ **वटधानिका**-वडाची बी. **अणु**-परमाणु **तुंबी**-भोपळीचा वेल. **पिप्पल**-पिंपळ. प. १० **पाटल**-गुलाबी; भगवा. **हारीत**-हिरवा. **गाहिरा**-पोपटी. **पांडुर**-पांढरा. **षड्विध**-सहा प्रकारचे; नाना प्रकारचे. प. ११ **तुवरता**-तुरटपणा. **वृन्त**-देंठ. **तिक्तता**-तिखटपणा. **गर्भी**—पोटांत. **अमृतता**—माधुर्य. ' अ ' ला गुरुत्व नसल्यामुळें छन्दोभंग. **त्वचा**—साल. **कटुता**—कडवटपणा. **कोश**—बाठी. **काषायता**—तुरटपणा. येथें षड्सांपैकीं अम्ल व लवण हे गळले आहेत आणि मधुर व तुरट हे दोनदां आले आहेत. प. १२ **मेदिनी**—पृथ्वी. **अग्नेराप**--अग्नेः+आप=अग्नीपासून उदक (झालें). **श्रुति**--वेद प्राचीनकाळीं छापण्याची कला तर नव्हतीच पण लेखनकलाही नव्हती. त्या वेळीं विद्वान् लोक परंपरेनें ऐकून ऐकूनच वेदाचीं सूक्तें तोंडपाठ करीत त्यावरून ' श्रुति ' असें वेदास नांव पडलें आहे. **सौदामिनी**-वीज. **बाष्प**-वाफ. प. १३ **पृथ्वी**-माती, मृत्तिका. **विरे**-विरवळते. **अनिल**-वायु, वारा. **शोषणें**-सुकविणें. **चेतवि**-उत्तेजित करतो. **अनल**-अग्नि. **पंचक**-पृथ्वी, अप्, तेजस्, वायु व आकाश ह्या पंचमहाभूतांना 'भूतपंचक,' असें म्हणतात. **अन्योन्य**-अन्य+अन्य-अन्योन्य, परस्पर. **संमिश्रण**-एक जीव होणें प. १४ **गोमय**-शेण. **माजी**-मध्यें. **दधी**-दहीं. **वासर**-दिवस. **वृश्चिक**-विंचू. **चेतनकार्य**-सजीवपणा. **जड**-निर्जीव. प. १५ **सजातीय**-एकाच जातीचें. **सिद्धांतिलें**-सिद्धांत रूपानें सांगितलें. **आचार्य**-शंकराचार्य. **तद्विपरीत**-त्याच्याही उलट. **सच्चेतन**-खरें सजीव. प. १६ जाग्रत्, स्वप्न, सुषुप्ति, तुर्या आणि उन्मनी अशा जागृतीपासून लयापर्यंत पांच अवस्था मनाच्या

होतात, असें योगशास्त्रांत मानलें आहे. **प्रत्यक्ष**—अनुभूत. **जीव**—व्यक्तीमधील चैतन्य प १७ **श्रोतृगण**—श्रोत्यांचा समुदाय. **अनेकरूप**—विविधरूप, अनेक. **रव**—शब्द. प. १८ **चराचर**—चर+अचर—स्थावर—जंगम, सचेतन व अचेतन. **कलहो**—तंटा, वाद. **जीव**—व्यक्तीचा आत्मा. **शिव**—परमात्मा, सर्वव्यापी आत्मा. **अंश**-भाग. **अंशी**-ज्याला अंश असतात तो, सगळा, पूर्ण. ह्या उताऱ्याचें वृत्त **शार्दूलविक्रीडित** आहे.

## ५. देवावर निष्ठा. पृ. ८—९.

प. १ **निरूपण**—भजनी कीर्तन; वारकरी संप्रदायाचें कीर्तन. प. २ **नेमस्त**—निश्चयानें. प. ३ **अनन्यभावें**-एकनिष्ठेनें. **वेंचावें**-खर्च करावें. प. ४ **जिवलग**—जिव्हाळ्याचें माणूस. प. ५ **अवघें**—सर्वस्व. **जीवेभावें**—अंतःकरणापासून. प. ६ **वित्त**—द्रव्य, धन. **परमात्मा**—परमेश्वर. प. ७ **मनोगत**—इच्छा. **अंतरणें**—विस्मरणें प. ८ **वर्तावें**-वागावें. **मानावें**-मान्य करावें. **भावे**—प्रसन्न होतो. प. ९ **कायसी** काय ? कितीशी ? **वधी**—ठार मारते. **विपत्तिकाळीं**—संकटसमयीं, दुष्काळांत. प. १० **वज्रपंजरू**—वज्राचा पिंजरा, अर्थात् भक्कम राहण्याचें ठिकाण. **वज्र**-इंद्राचें अति कठोर अस्त्र. प. ११ **कैवारी**—बाजू सांभाळणारा. **पतितासि**—अधोगतीला गेलेल्या माणसाला. **अनाथ**-दीन, दुबळा.

## ६. मैत्रेय मुनीचा कौरवांस शाप. पृ ९—११.

प. १ **अंबिकासुत**—धृतराष्ट्र. **सन्मानीत**—स्वागत केलें. प. २ **आगमन**—येणें. **काम्यकवन**—एक अरण्यविशेष. प. ३ **जटाधर**—जटा धारण करणारे. **वल्कल**—वृक्षाच्या सालीचीं वस्त्रें. **उष्ण**—उन्ह. प. ४ **सुकुमार**—नाजूक. **पांचाली**-पंचालदेशाच्या राजाची कन्या, द्रौपदी. **लावण्यशाली**—सौंदर्ययुक्त. **कोमाइली**—निस्तेज झाली. **चंपककलिका**—चाफ्याची कळी. **आपाद**—पायापर्यंत. प० ५ **पांडुनंदन**-पांडुराजाचे पुत्र, पांडव. प. ६ **विख्यात**—नामांकित. **बलवंत**-बलाढ्य. प. ७ **वैश्वानर**—अग्नि. **जर्जर**—त्रस्त. **निर्जरेश्वर**—निर्जर+ईश्वर देवांचा राजा, इंद्र. **कपिवरध्वज**-कपिवर म्हणजे वानरश्रेष्ठ मारुति आहे ध्वजावर ज्याच्या तो—अर्जुन. **समर**—युद्ध. प. ८ **यथाविभाग**—वांटणीनें योग्य ठरेल तें. **समत्वें**—सारख्या हिश्शानें, निःपक्षपातानें. प. ९ **द्रोह**-द्वेष. **पृथानंदन**—कुंतीचे पुत्र. प. १० **कृशान**-अग्नि. **श्मश्रु** मिशी. **अंक**-मांडी. प. ११ **सव्य**—डावा. **पद**—पाय. **घांसी**—आपटला. **पापाची खाणी**—पापाची रास. **अधर**—ओंठ. **दशनें**—दांतांनीं. **रगडित**—चावूं लागला. प. २ **मृडानीरमण**—मृडांनी म्ह० पार्वती हिचा रमण म्ह० पति, शंकर. **दारुण**—भयंकर. **अलोट**—अनुल्लंघनीय. प. १३ **कुटिल**—कपटी. प. १४ **ब्रह्मज्ञ**—ब्रह्म जाणणारे, ब्राह्मण. **मलिन**—पातकी. **विद्युल्लता**—विद्युत्+लता वीज.

प. १५ **अंक**–मांडी. **जलजासन**–जलज+आसन–कमल आहे आसन ज्याचें तो–ब्रह्मदेव. **पें**–पादपूरणार्थक अन्वय प. १६ **बस्त**-बोकड. **श्वान**–कुत्रें. प. १७ **पक्क**–पिकलेला. प. १८ **सवेंचि**–लागलाच. **अंतर्धान पावला**–अदृश्य झाला. **काया**–देह. **नेणवे**–जाणतां येत नाही.

## ७. जमदग्नीचा कोप. पृ. ११–१४.

प. १ **वध**–शिरच्छेद. **सहस्रार्जुन**–या नांवाचा एक राजा, ह्याला एक हजार हात होते! **जमदग्नि**–परशुरामाचा पिता. **दीनवेष**-भिकाऱ्याचें सोंग. प. २ **विहित**–योग्य. **अतिथि**–पांथ, पाहुणा. प. ३ **करार्ग्री**–हाताच्या पंजानें, बोटांनीं. प. ४ **येरी**–ती **कपटवेष**-सोंग घेतलेला. **शंकली**-बुचकळ्यांत पडली. प. ५ **विख**–विष. प. ६ **कोपेल**–रागावेल. **संकोचता**–भीति, चिंता. **कर्तव्यता**–काय करावें तें. प. ७ **अग्रोदक**–आचमनाचें पाणी. प. ८ **विघ्न**-संकट. प. ९ **कृत्या**-केदार्शाण. **पराङ्मुख**–विरुद्ध. प. १० **निर्मोलें**–फुकटचें, बिनमोलाचें. प. ११ **गृहिणी**-पत्नी. **संभ्रम**–आदर. प. १२ **पाचारोनि**–हाक मारून. **ममाज्ञेसीं**–माझ्या आज्ञेवरून. प. १३ **वध्य**–प्राण घेण्यास योग्य. **विचारीं**–विचार करावा. प. १४ **प्रेत**-गतप्राण देह. प. १५ **ऋषिभयें**-ऋषीच्या भयानें. प. १६ **धाकें**–भीतीने. प. १७ **दारुण**–भयंकर. **क्षोभलपण**–राग, संताप. प. १८ **परशधर**–परशुराम. **सुमनें**-पुष्पें. **दुर्धर**–दुःसह. प. १९ **येरें**–त्यानें. प. २० **अवधारीं**–ऐका. २१ **दवडावी**–नाहींशी करावी. प. २२ **निर्मुक्त**–मोकळें. **चेतनासुखें**–सजीवपणानें. प. २३ **दुखंड**–दोन्ही शकलें. **सुरवाडें**–समृद्धीनें. **वाडेंकोडें**–मोठ्या आनंदानें. प. २४ **नाठवो**–स्मरूं नये. **वरदता**–वरप्रदान. प. २५ **छेदिलेपण**-मारलें ही स्थिति. **घाय**–घाव. **वण** जखमा. प. २६ **वरद** वर देणारा. **तांतडी**–त्वरेनें. प. २७ **सावचित्त**–सावध. **निजघात**–आपल्याला मारलेलें. प. २८ **रणेविजयी** युद्धांत निरंतर यशस्वी. प. २९ **उद्विग्न** उदास. **निदान**–परिणाम. **अधःपतन**–दुर्गति.

## ८. वासंती आणि रामचंद्र. पृ. १४–१८.

प. १ **रंभा**–केळ. **शयनास**–निजावयाच्या. **तृण**–गवत, चारा. **मृग**—हरिण ( वसंततिलिका वृ. ) प. २ **फल**–फळें. **मधु**-मध. **कुसुमें**–पुष्पें. **पूजोत**-पूजा करोत, सन्मान देवोत. **शकुंत**-पक्षी; **वनांतीं**–वनांत.( मालिनी वृत्त. ) प. ३ **अंजली** ओंजळ. **शकुनि**–पक्षी. **मैथिली**–सीता.(मालिनी वृत्त.) प. ४ **नवमेघश्याम**–नवीन मेघाप्रमाणें श्यामवर्ण. **मिथिलेशकुमारी**-मिथिलेचा स्वामी जनक याची कन्या सीता. **कांतार**–अरण्य. **विजन**–निर्मनुष्य. **त्यजिली**–सोडली. **मोकलिलें**–सोडलें. **उर**–वक्षःस्थल. **अबला**-स्त्री.प.५वि-

**सांवा**-विश्रांति. **चंद्रिका**-चांदणें. **सुधा**-अमृत. **वा**-अथवा (वसंततिलका वृत्त) **प. ६ कठिणहृदय**-कठोर अंतःकरणाचा. **गति** दशा. **नरेंद्रा**-नरश्रेष्ठा! (मालिनी वृत्त.) **प. ७ सुविलोल**-फार चंचल. **शरीरलतिका**-शरीररूपवल्ली. **कुसुमीं**-पुष्पांनी. **हिंसक**-हिंस्र ( वसंततिलका वृत्त. ) **प. ७ उलतें**-फुटतें आहे. **द्विविधा**-दुभंग. **विकल**-विह्वल-**जीवित**-प्राण. **न संहरी**-नाश करीत नाहीं. **विधि**-दैव. **मर्मोद्भेदा**—मर्माचा भेद किंवा विदारण ( हरिणी वृत्त. ) **प. ८ देवी**-सीता. **रुचली**-आवडली **तृणवत्**-केरासारखी. **शोचली**-शोक केला. **परिचिता**-ओळखीच्या. **राहावितीं**- उरविलीं. **धिर**-धीर. ( हरिणी वृत्त. ) **प. ९ लोक**-जग. **प्रायः**—बहुतकरून. ( शालिनी वृत्त. ) **प. १० वेगें**—जोरानें. **अहि**-सर्प. **विषयुक्त**-विषारी. **शंकु**-शल्य. ( इंद्रवज्रा वृत्त.) **प. ११ शोक**-दुःख. **क्षोभ**-मनोवृत्तींचा खळखळाट. **प्रसर**-ओघ, वेग. **शमन**—कमी करणें, दाबणें. **क्षेत्र**-शेत. **सिकतासेतु**-वाळूचा बांध, पूल. **तोयपूर**—पाण्याचा लोंढा. ( मंदाक्रांता वृत्त. ) **प. १२ कुंज**-जाळी, लतामंडप. **गोमटी**-सुदरी, सीता. **विलास**-क्रीडा. **शंका**-भीति. **प्रणामांजलि**-हात जोडणें. ( मंदाक्रांता वृत्त. ) **प. १३ गळाला**-व्याकुळ झाला. **त्रिभुवन**-स्वर्ग, मृत्यु आणि पाताळ. **अंतरात्मा**-काळीज. **जळाला**-करपून गेला. **दुःखभार**—दुःखाचें ओझें. **व्यापी**-संचार करतो. ( मंदाक्रांता वृत्त. )

## ९. संतांना दंडवत. पृ. १८–१९.

**पतित**-पातकी, अनधिकारी. **वानूं**-वर्णन करूं. **उद्धरावे**-ऊर्जितदशेस आणावेत. **जड**-मंदमति, अज्ञान. **कुळाचार**-वंशपरंपरेनें चालत आलेला आचार **कैवल्य**-मोक्ष. **आगर**-स्थान, घर. **धणी**-मालक. **खद्योत**-काजवा. **चिंतामणि**-इच्छित वस्तु देणारें रत्न. **कल्पतरू**-इच्छित वस्तु देणारा वृक्ष. **मशक** घुगुरडें. **वाराणशी**-काशी. **कोड**-कौतुक. **पाड**-बरोबरी, थोरवी. **मुष्टी**-मूठ. **फावे**-पुरे होते. **जंबुक**-कोल्हा. **उटावें**-घासावें. **निरे**-परिपूर्ण.

## १० तुफान. पृ. १९–२२.

( ह्या उताऱ्यातील श्लोकांचें वृत्त ' मालिनी ' आहे. )

**प. १ जवन**-वेगवान् **पवन**-वारा. **सायक**-बाण. **गति**-वेग, **जलनिधि**—समुद्र. **कहर**-अनर्थ. **तारूं**-गलबत. **प. २ मागुती**-पुन्हां. **पखाल**—पाणी भरण्याची चामड्याची पिशवी **खलाशी**-नावाडी. **खल**-दुष्ट, दुर्जन. **प० लहरी** लाटा. **पर्वतप्राय**-पर्वतासारख्या- **तुंग**-उंच. **विकलवदनें**—दीनमुखानें. **चिंतारवाचा**-दुःखाच्या शब्दांचा. **प० ४ उग्र**-भयंकर. **मुद्रा**-स्वरूप. **व्यसन**-संकट. **कल्लोळ**-खळाळ. **विधिलिखित**-नशीब. **ललाटीं**-कपाळीं. **प० ५ गवसेना**-सांपडत नाहीं. **अवजार**-शीड. **खिन्न**-

उदासीन. प० ६ **तारिं**-संरक्षण कर. **श्रीफल**-नारळ. प० ७ **आपटे**—आदळते. **तराजू**-तागडी, कांटा. **प्रतिसमयीं**-प्रत्येक खेपेस.प० ८ **वळणसुद्**-बांकदार. **छत्र**—वरचें आच्छादन. **वदन**—तोंड. **काळें**-मृत्यूनें- प० ९ **स्थळ**--जागा. **वसन**-वस्त्र. **चिंब**—ओलें. **बधीर**—मेहेरलेलें. **धीर**—धैर्य. प० १० **डोलकाठी**—शीड बांधण्याचा खांब. प० ११ **कवळुनि**—मिठी मारून. **कपाळा**—कपाळापर्यंत. **विश्वपाळ**-परमेश्वर. प० १२ **शून्य**-सुनें; पक्षी वगैरे नाहींत असें. **सिंधुपात्र**—समुद्राचा विस्तार. प० १३ **सभय**—भयभीत. **मीन**-मासे. **जलचर**-पाण्यांतील जंतु. **सैरवैरा**-स्वेच्छ, वाटेल तिकडे. **लोभ**—प्रेम. **वैर**-द्वेष. प० १४०**गलबत**-तारूं. **खुटवीलें**—थांबविलें. **जलधिसंगें**—समुद्राबरोबर. **नाटिके**--टिकत नाहीं. **संगर**--झुंज. प० १५ **स्वैर**-आडमार्गानें. **दैव**-नशीब. **घाला**-संकट, अनर्थ. **जलद**—लौकरलौकर. **हल**--नांगर. प० १६ **आयू**—आयुष्य. **हलाचा**--नांगराचा. **प्रगट**--स्पष्ट **निवळ**-शुद्ध. **जीवित**--आयुष्य. प० १७ **घडिघडि**--घटकेघटकेला **दचकुनि**- भिऊन. **निशिदिनिं**—रात्रंदिवस. **घोर**—चिंता. **नीच**-क्षुद्र मनुष्य. प० १८ **दीनवाणी**-दुबळ्यासारखें. **विवेक**-विचार. प० १९ **निबिड**—गर्द. **मेघपंक्ति**-ढगांच्या ओळी. **ओतती** वर्षाव करतात. **गर्जना**-मेघांचा गडगडाट. **जलद**--लौकर. **जलद**-जल + द=मेघ. **पवि**-वज्र. प. २० **कोंदून**-भरून. **घसरुनि**-खाली येऊन.

## ११. अन्योक्तिकलाप-पृ० २२-२५.

प. १(स्रग्धरा वृत्त)**ज्याचे**-याचा संबंध 'दिवस' या शब्दाकडे.**बहल**-विपुल, प्रचुर.**भृंगांगना**-भृंग+अंगना-भ्रमरी .**गुंजारव**-गुणगुणणें. **मत्त**-पुष्ट. **अधम**-नीच. **चंचुघात**-चोंचींचा मारा. **थारा**-आश्रय. **वांकडा**-विपरीत. **काळ**-दिवस. प. २ ( शार्दूलविक्रीडित वृत्त.) **ध्वनी**-शब्द.**विद्युल्लता**-वीज. **नभीं**-आकाशांत.**वर्षाकाळ**-पर्जन्यकाळ. **दवानल**-वणवा. प ३ (शिखरिणी वृत्त.) **शुक**-राघू, पोपट. **गड्या**-मित्रा. **स्वातंत्र्य**-स्वच्छंदीपणा. **अनुपम**-अतुल. **मुकणें**-अंतरणें. प. ४ ( स्रग्धरा वृत्त. ) **भृंगे**-भ्रमर. **मत्त**-मदोन्मत्त. **जीतें**-ज्या गुहेला पाहून असा संबंध. **भयभरें**-भीतीच्या भरानें, फार भयानें. **धृति**-धैर्य. **मुक्ताफळ**-मोत्यें. **खच**-पेर. प. ५ ( स्रग्धरा वृत्त. ) **खवळुनि**-क्षुब्ध होऊन. **काका**-कावळ्या. **मांसखंड**-मासाचा तुकडा. **खरतर नखरीं**-अत्यंत तीक्ष्ण नखांनीं. **धाला** तृप्त झाला. **कणातें**-तुकड्याला. प. ६ ( मंदाक्रांता वृत्त ) **पाश**-दोर. **अंकुश**-हत्तीला डोक्यावर मारण्याचें लोखंडी हत्यार. **गंड**-गंडस्थळ.

**जीपेक्षां**-ज्या दशेपेक्षां असा संबंध. **मद**-गर्व. **प. ७** ( शार्दूलविक्रीडित वृत्त. ) **दावाग्नि**-वणवा. **शिखी**-शिखा. म्ह० शेंडी आहे ज्याला तो शिखी, मोर. **रावे**-पोपट. **संकटकाळ**-विपत्तीचा प्रसंग. **प. ८** ( पृथ्वी वृत्त ) **विलसति**-शोभतात. **विविध**-नानाप्रकारचे. **दैव**-प्रारब्ध. **प. ९** ( शार्दूलविक्रीडित वृत्त. ) **पल्लव**-पानें. **मंगलप्रद**-शुभदायक. **शीण**-श्रम. **सुधा**-अमृत. **वनश्री**-सृष्टिदेवी. **समसमां**-सारख्यासारख्यांचा **प. १०** ( स्रग्धरा वृत्त. ) **कोक**-चक्रवाक पक्षी. **दयिता**-स्त्री. **संगम** भेट. **कारागीर**-बंदीखाना. **कर**-किरण. **मित्र**-रवि, सूर्य. **तोष**-संतोष. **प. ११** ( शार्दूलविक्रीडित वृत्त.) **द्विज**-पक्षी; द्वि+ज=दोनदां जन्म झाला आहे ज्यांचा ते. ब्राह्मण, पक्षी, दांत इ. **शार्दूल**-वाघ. **गिर्यंतर्गी**-पर्वताच्या गुहेत, गिरिकंदरीं. **भास्कर**-सूर्य. **बोल**-म्हणणें. **प. १२** ( स्रग्धरा वृत्त. ) **कृश**-क्षीण, बारीक. **बीज**-द्वितीया. **शशि** चंद्र. **वंदिती**-नमस्कार करतात. **कला**-अंश. **प. १३** ( शार्दूलविक्रीडित वृत्त. ) **जलधर**-मेघ **वर्षसी**-वर्षाव करतोस. **पीडा**-दुःख. **नाविकजन**-खलाशी लोक. **प. १४** ( स्रग्धरा वृत्त. ) **पद्मखंडें**-कमलांचे ताटवे. **विखरती**-पसरतात. **गंध** सुवास. **चित्तापहारी**-मनास आल्हाद देणारा. **मानस**-मानस सरोवर; हें हिमालयांत नेपाळच्या पलीकडच्या भागांत असून तिकडे जाण्याचा प्रवास फार कठीण आहे. **पंक**-चिखल. **प. १५** ( स्रग्धरा वृत्त. ) **प्राणिमात्रा**-प्रत्येक प्राण्याला. **अंबुद**-अंबु+द=पाणी देणारा; मेघ. **धवल**-पांढरा. **कृष्ण**-काळा. **साचा**-खरोखर.

## १२. काय हा संसार ! पृ. २६.

**प. १ अहर्निशीं**-रात्रंदिवस. **दुश्चल**-प्रबळ; अत्यंत उच्छृंखळ. **प. २ उद्वेग**-मनास खिन्नता आणणारा. **भंगे**-हिरमोड होतो. **प. ३ वृत्ति**-वतन. **गेह**-घर. **जगमान**-लोकांत मानमान्यता. **दृढावलें**-अधिक बळकट झालें. **प. ४ खेद**-दुःख. **वृत्ति**-समाधानवृत्ति. **प. ५ विरक्ति**-वैराग्य; उदासीनपणा. **कोविं**-कशी. **घडे**-होईल. **प. ६ पतित**-पातकी. **पापराशी**-पातकाचा संचय. **प. ७ दोष**-अपराध. **गांठीं**-पदरीं. **प. ८ संसार**-प्रपंच. **प. ९ बंधुजन**-इष्टमित्र. **प. १० मानिला**-धरला. **भरंवसा**-विश्वास. **जगदीश**-परमेश्वर. **प. ११ अहंभाव**- मीपणा; गर्व. **प. १२ अभिमान**-भार. **कुटुंब**-मुलेंबाळें. **प. १३** प्रारब्धाचा ठेवा प्रपंचीं रंगला-पूर्वसंचित कर्म संसारांत फलद्रूप झालें; अंतीं वृद्धपणीं देह खंगला, इत्यादि अन्वय. **प. १४ चळले**-कांपूं लागलें. **श्रवण**-कान. **बधीर**-बहिरे. **प. १५ गेले**-शक्तिहीन झाले. **प. १६ भारी**-अत्यंत. **प. १७ नेदी**-देत नाहीं. **तेही**-त्यांनीसुद्धां. **वोसंडीलें**-उपेक्षा केली. **प. १८ खंगलीया**-क्षीण झाल्यावर. **प. १९ बोबडी**-अडखळणें. **कंठ**-

गळा. प. २० **अंतकाळ**-मरणसमय. **विपत्ती**-दुःखें. प. २१ **जिवलग**—फार मायेची. **म.ती**-देह. **उचलावी**-काढून टाकावी. **माती**-मरून जावें. **अंतरीं**-मनांत. **सोयरीं**-सोबती. प. २२ **दुःखाचीं चोरटीं**—कठीण समय पाहून दूर पळणारी.

## १३. अंगदशिष्टाई. पृ० २७–२९.

प. १ **रात्रिंचर**-राक्षस. **अंगदाभिध**-अंगद ह्या नांवाचा. **दूत**-सेवक. **अधम**-नीच. प. २ **वैदेही**-जानकी. **रमण**-पति. **जगद्गीत**-सारें विश्व ज्याचे गुणानुवाद गाते असा. **कल्याणहेतुसद्गीतें**-**कल्याण + हेतु+सत्+गीतें** ( गी--वाणी ) कल्याणप्रद चांगल्या वाणीस. प. ३ **चतुरानन**-ब्रह्मदेव, चतुर् + आनन-चार आहेत तोंडें ज्याला तो. **पौत्र**-पुत्राचा पुत्र. **भूतपति**-शंकर. **श्रुतसंपन्न**-वेदाध्ययन केलेला. **नयज्ञ**-न्यायशास्त्रवेत्ता. **ब्राह्मणसुत**—ब्राह्मणाचा पुत्र. **सुपदास**—श्रेष्ठपदाला. प. ४ **सुर**—देव. **भूसुर**—भूदेव, ब्राह्मण. **धर्मसेतु**-धर्मबंधनें. **व्यसन**—वाईट संवय. **अनाचार**-दुर्वर्तन. प. ५ **विहिताचार**-योग्य वर्तन. **नीच**-हलका. **जननीचा** आईच्या. प. ६ **विधिवर**-ब्रह्मदेवानें दिलेला वर. **वन्यकुंजर**-जंगली हत्ती. **धर्म-द्रु**-धर्मरूपवृक्ष. **ध्वस्त**-मोडलेला. **वेद-कुंज--रसा**—वेदाच्या लतामंडपांनं सुशोभित असलेली पृथ्वी. प. ७ **विप्रामर**--विप्र + अमर. ब्राह्मण आणि देव. **कैरवपति**-( कैरव-श्वेतकमल)चंद्र. **निभ** सारखें. **स्वैर**-स्वच्छंद. प. ८ **परांगना**-परस्त्री. **निरयप्रद**-नरक देणारा. प ९ **अंजन**-कलंक. **प्रसू**-आई. **विष्ठा**-नरक. **यशःप्रदा**-कीर्तिकर. प. १० **हितोपदेष्टा**-हितोपदेशक. **द्वेष्टा**-द्वेषी. **स्वेष्टांशि**-आपल्या आतस्वकीयांना. **मंतु**-अपराध. प. ११ **सुता**-कन्या. **अजसूनु**-दशरथ. **सद्वृत्त**-सदाचारी. प. १२ **जनाधम**-लोकांत नीच. **पुलस्त्य**-रावणाचा बाप. रावण हा ब्राह्मणाचा पुत्र असून वेदाध्ययन केलेला होता, इतकेंच नव्हे, तर ऋग्वेदसंहितेची सर्व पदें त्यानेंच केलेलीं असल्याबद्दल फार प्राचीन काळापासून आख्यायिका चालत आली आहे. प. १३ **प्राज्ञ**-शहाणा. **निलय** स्थान. **लय**-नाश. प. १४ **रविवंशज**—सूर्यवंशांत उत्पन्न झालेले. **भ्रूलता**-भोंवई. **चापलता**-चाप, धनुष्य. **चापलता**-चपलपणा. **जिष्णु**-इंद्र. प. १५ **प्रियावियोग**-प्रियपत्नीची ताटातूट. **विपरीत**-विरुद्ध. (१६) **वैदेही** सीता. **लंकाजीवन**-लंकेचा प्राण, रावण. **समर्पीन**-देईन. प. १७ **सायक**-बाण. **खड्ग** तरवार. **जयधन**-विजयवैभव. **निधन**-मृत्यु. प. १८ **राजेंद्र**-राजाधिराज. **सीतोपायन**-सीतारूपी नजराणा. प. १९ **समर**—युद्ध. **भ्रमरसम**-भृंगासारखा. **अंघ्रि**-चरण. **नवपद्म**-ताजें कमल. **रम**-रममाण हो. **अमराचि**-देव. प. २० **निजलासा**-निद्रेंत असल्याप्रमाणें. **मूकसा**-

मुक्यासारखा. प. २१ **यक्षप**-कुबेर. **विधु**-चंद्र. **ब्रध्न**-सूर्य. प. २२ **रिपु-लोककाल**-शत्रुजनांचा काळ. प. २३ **तूल**-कापूस. **शैल**-पर्वत. **पिचविल**-पीठ करून टाकील. प. २४ **यति**-संन्यासी. **वेष**-सोंग. **बाटवुनी**-भ्रष्ट करून. **दलकुटी**-पर्णकुटी. प. २५ **दलन**-फोडणें. **गिरिदलन**-पर्वताचें चूर्ण करणें.

## १४. हिमालयपर्वतावरील सृष्टिशोभा. पृ. २९– ३४.

प. १ ( १ ते ६ श्लोकांचें वसंततिलकावृत्त. ) **प्रकल्पित**-विभागलेल्या. प. २ **जागजागीं**-ठिकठिकाणीं. **भूविभागीं**-भूप्रदेशांत. **रम्य**-रमणीय. प. ३ **वसंतसमयीं**-वसंतऋतूंत. **मधुमक्षिका**-मधमाशी. **सुम**-पुष्प. **वाटिका**-उद्यान **प्रमोद**-मोठा आनंद. प. ४ **मन्मन** -मत्+मन-माझें मन. **नग**-पर्वत. **आनद+सिंधु+लहरींत**-हर्षसागराच्या लाटेंत. **वस्तुसमूह**-पदार्थसमुच्चय. प. ५ **ते**-ती. **सानंद**-आनंदानें प. ६ **यथाक्रमानें**-अनुक्रमानें. **निरखी**-पहाते. प. ७ ( ७ ते २३ मंदाक्रांतावृत्त ) **वलय**—कडें **घोर**—भयंकर. प. ८ **सलिल**—पाणी. **निर्झर**—झरा. **लंबरूपी**-लंब, उभा. प. ९ **विपिन**—अरण्य. **यवस**—गवत. प. १० **अविरल** - दाट. **वेतस** वेत. **जीर्ण**—कुजलेली. **विषमय**— विषारी. प. ११ **श्वापदें** हिंस्रपशु. **निर्भय**—भयरहित. प. १२ **द्विरद** हत्ती. **यूथ**—कळप. **वास**—वस्ती. **कुंज**—जाळी. **वन्य**-जंगली. **कोटर**—ढोल. **ऋक्ष** अस्वल. प. १३ **भी**-भीति. **वितत**-पसरलेले. **अनूप**-जलमय प्रदेश, दलदल प. १४ **लवण**-सखल जमीन. प. १५ **ओघ**-प्रवाह. **स्फटिकसदृश**-स्फटिकासारखें. **ताट्या**-ताटवे. प. १६ **गुलतुर**—गुलछबु. **शतदली** शंभर पाकळ्यांचें. **कासार**-सरोवर. **सलिल**-पाणी. प. १७ **सहचरी**-स्त्री. **द्रुम**-वृक्ष. प. १८ **तमाल**-काळ्या सालीचा एक वृक्ष. प. १९ **गुंफा**-गुहा. **निपतति**-खालीं पडतात. प. २० **परभृत**-कोकिळ. पर+भृत-दुसऱ्याकडून पोसला गेलेला. कोकिळाला आपलीं अंडीं उबवितां येत नाहीत म्हणून तो तीं कावळ्याच्या घरट्यांत नेऊन घालतो; व कावळा तीं आपलींच समजून उबवितो व फोडतो ! म्हणून कोकिळाला 'परभृत' असा शब्द लावतात. प. २१ **कंदर**-गुहा. **स्तनित**-गर्जना. **चित्रवर्ण**-नाना प्रकारच्या वर्णांचा. **गलत्**-गळत असलेला. **वृक्षस्कंधीं**-झाडांच्या फांद्यांवर. **तांडव**-एक प्रकारचें नृत्य. प. २२ **हिमानी**-बर्फाची रास. **हरित**-हिरवीं. **संघ**-कळप. प. २३ **वन्य**-रानटी. **छगल**-बकरी. **आत्मजातुल्य**-मुलासारखें **शाल**-लोकरीचें महावस्त्र. प. २४ (येथून शेवटपर्यंत शार्दूलविक्रीडित वृत्त.) **तिंतिडिका**-चिंच. प. २५ **आवास**-वास्तव्य. **उद्भिद**-वनस्पति. प २६ **भूर्ज**-एक प्रकारचें झाड. **कस्तुरीमृग**-ज्यांच्या नाभीमध्यें कस्तूरी सांपडते तीं

हरणें. **मदोद्धत**–मदोन्मत्त. **आस्पद**–स्थान **प. २७ पातविशीर्ण**–पडून फाकलेलीं. **तूर्ण** त्वरित. **शतधा**–शेंकडों प्रकारांनी **प. २८ भीमरव**–भयंकर गर्जना. **नादावती**–घुमतात. **सोपान**–जिना. **प. २९ अद्रि**–पर्वत. **क्षीरविपांडु**–दुधासारखें पांढरें शुभ्र. **भास्वान्**–सूर्य. **प. ३० वितरती**–देतात. **प. ३१ नभोभ्यंतरीं**–आकाशांत. **आदिम**–पहिला. **वर्णकता**–रंगाचें साम्य.

## १५. कीचकवध. पृ. ३४–३६.

**प. १ हासडिला**–हिसका दिला. **संग्राम**–युद्ध. **प. २ अंतरें**–ओढून. **थरकंपु**–हादरणें. **प. ३ दिगंतरें**–दूरचे प्रदेश. **प्रासाद**–वाडे. **प. ४ महामारी**–मरकी, प्रळय. **प. ५ मुष्टिघात**–बुक्क्यांचा मारा. **निघात**–तडाके. **प. ६ हुमणी**–बुक्के. **कुट**–चूर. **मित्रावर्ण**–अगस्ति. ( मैत्रावरुणि ) **प. ७. तवकें**–क्रोधानें. **असुर**–हिरण्यकशिपु. **प. ८ नाग**–हत्ती. **नवनागसहस्रबळि**–नऊ हजार हत्तींचें बळ आहे ज्याला असा. **कंठनाळी**–नरड्याला. **प. ९ गजेंद्र**–विष्णनें नक्रापासून सोडविलेला हत्ती. **शरभ**–सिंहाला मारणारा पक्षी. **प. १०. महामाया**–आदिशक्ति, भवानी. **अंधक**–एक राक्षस. **अखया–अक्ष** – रावणाचा मुलगा. **अशोकवन**–लंकेंतील एक उद्यान–रावणानें सीतेला ह्याच उद्यानांत ठेवली होती **प. ११. झुंजिन्नले**–झुंजले. **किष्किंधातळीं** वालीची राजधानी किष्किंधा, तिच्यांत. **कंदन**–मारामारी. **प. १२ आंगवण**–अंगची शक्ति. **शेखीं**–शेवटीं. **प. १३ गाढे**–मोठमोठ्या. **इडेपाडें**–वीरश्रीनें. **प. १४ जगजेठी**–जगत्प्रसिद्ध मल्ल. **भूतटीं**–जमिनीवर. **प. १५ भोवंडोनी**–गर गर गर गर फिरवून. **सव्य**–डावा. **अंगुष्ठ** आंगठा **किरात**–पारधी. **ग्रीवा**–मान. **कूर्म**–कासव. **प. १८ अस्थिजाळ**–हाडांचा पिंजरा. **गोळांगुळ**–गोळा. **प १९ सुरीं**–देवांनीं.

## १६. द्वारकावर्णन. पृ. ३६–३७.

**प. १** [ शिखरिणी वृत्त. ] **अनर्घ्य**–अमोल. **नभचुंबित**–गगनास पोंचलेले. 'रविचंद्रज्वालातडिद्दीप्ति'–असा समास पाहिजे. पण येथे वृत्त जुळविण्याकरितां ओढाताण झाली आहे. **अनल**–अग्नि. **तडित्**–वीज. **वसती** घरें. **सरितपती**–(सरित्पति)—समुद्र. **दुर्ग**–किल्ला. **हारी**–ओळ. **प. २** [ शार्दूलविक्रीडित वृत्त. ] माणिक्य, पुष्पराग, मरकत, वैडूर्य इत्यादि रत्नें आहेत **प. ३** [ स्रग्विणी ] **दिव्य**—देदीप्यमान. **दाम**–माळा. **उदर**—आंतील भाग. दामोदरें हा बहुव्रीहि समास असून मंदिरें याचें विशेषण आहे. **प. ४** [ स्वागतावृत्त] **वैश्रवण**—कुबेर. **अकलंक**—निष्कलंक, निर्मळ. **प. ५** [ स्वा. वृ. ] **सुखाडे**—समृद्ध. **पवमान**—वारा. **पवमान**—वेदमंत्रविशेष. **प. ६**

[ शार्दूलविक्रीडित ] **मंगलमूर्ति**—गजानन. **दिक्पति**—दिशांचे पति. **हंसासना**-हंस आसन जीचें अशी. **शारदा**-सरस्वती. **भैरव**-शंकराचा एक भयंकर स्वरूपाचा अवतार. **महासिद्धि**—अणिमा, गरिमा इत्यादि मोठ्या सिद्धि. मुद्रा, दिग्पति व मातृका आठ आठ आहेत. **नवनिधि**—कुबेराचे महापद्म, शंख, मुकुंद इत्यादि नऊ निधि. **सुदर्शन**—विष्णूचें चक्र. **शार्दूलविक्रीड**—वाघासारखी क्रीडा आहे ज्याची असा ( कृष्ण ). ह्या पदांत श्लोकाचें वृत्तही सूचित आहे. हा श्लेषालंकार झाला. प. ७ [ शार्दूलविक्रीडित वृत्त ]. **त्रिंशत**—तीस. **रत्नाकर**—समुद्र. **विश्वकर्मा**-देवांचा सुतार. **सप्तति**-सत्तर. **आवर्त**-घेर. प. ८ [ स्वागतावृत्त ] **योजन**—चार कोसांचें एक योजन. **चतुरस्र**-चौकोनी. **गोपुरें**-चार वेशींचीं चार महाद्वारें. प. ९ [ उपेंद्रवज्रावृत्त ] **मुमुक्षु**-मोक्षाची इच्छा करणारी. प. १० [पृथ्वीवृत्त] **तडितापडी**—गोरगरीब, बैरागी. **जटिल**-जटाधारी. **कंदमूलाशनी**-कंदमुळे खाऊन राहणारे. **मठमंडप**—मठांतील मंडप. प. ११ [ रथोद्धतावृत्त ] **सप्तमोक्षपुरी**—अयोध्या, मथुरा, माया इ० सात मोक्षदायक पुरें. **उन्नत**-श्रेष्ठ. प. १२ [रथोद्धतावृत्त ] **परोपरी**—नानाप्रकारच्या. **कल्पवृक्ष**-इच्छित फल देणारा वृक्ष. **लवती**-वांकतात. प. १३ [भुजंगप्रयातवृत्त] **मर्मी**-सांध प. १४ [भु. प्र वृ.] **गोपुरें**—महाद्वारें. **चित्रिल्या**-रंगविलेल्या. **नाकपाळी**-इंद्र. प. १५ स्रग्धरावृत्त ] **भट**-योद्धे. **गणक**-ज्योतिषी. **गोपाळ**-गायी बाळगणारे, गौळी. **मंत्री** सर्पादिकांच्या विषावर मंत्रोपचार करणारे. **धात्री**-पृथ्वी. **आर्जिती**-संपादतात. प. १६ [पृथ्वीवृत्त] **चतुष्पथ**-चव्हाटे **मणिमनोहरा**-रत्नखचित. **वेदिका**-ओटे. **सरणि**-राजमार्ग. **पुरौकस**-पुर+ओकस्-घर=नगरवासी. **समार्जित**-सडासंमार्जन केलेले.

## १७. अंतरिक्षप्रवास. पृ. ३८–४४.

प. १ [ शार्दूलविक्रीडितवृत्त. ]**सांगातें**-बरोबर. **जनकात्मजा**-जानकी. **श्रीरामनामा हरी**-श्रीरामरूपी विष्णु-राम, हा विष्णूचा एक अवतार आहे. **रत्नाकर**-रत्न+आकर-रत्नांचा ठेवा, समुद्र. **पारशून्य**-ज्याचें पलीकडचें तीर दिसत नाहीं असा. **खालता**-खालीं. **दयिता**-प्रियपत्नी. प. २ [शा. वि. वृ.. **मैथिली**-सीता. **मलय**-दक्षिणेकडील एक पर्वत. **फेन**-फेस. **आवलि**-रांगा. **शरत्कालीं**-शरद् ऋतूंत प. ३ [शा. वि. वृ.] **अंबु**-पाणी, जल. **अंशु**-किरण-**अंभोभक्षक**-जल भक्षण करणारा. **वडवाग्नि**-समुद्रांत असणारा अग्नि. **लोकानंदन**-लोकांस आनंद देणारा. प. ४ [शा.वि.वृ ] **मातंग**-गज हत्ती. **जलनिधि**-समुद्र. **फेनगिरि**-फेसाचा पर्वत. **चामरें**-चवऱ्या. प. ५ [शा.वि.वृ.] **वेलानिल**-कांठावरील वायु **व्रज**-समुदाय. **फणा**-फडा. **फणी**-साप. प. ६ [शा वि. वृ ]

**सिंधु**-समुद्र. **वनिते**-स्त्रिये. **शुक्ति**-शिंपा. **प.** ७[शा वि.वृ.] **सैकतीं**-वाळवंटांत. **इंदु**-चंद्र. **प.** ८ [ शा. वि.वृ. ] **उद्भव**-उत्पत्ति. **मद**-माज, चिकट द्रव्य. **उष्णोत्थित**-उन्हानें उत्पन्न झालेला. **घर्माच्या**-घामाच्या. **कणिका**-बिंदु. **शुष्क**-सुकलेला. **प.** ९ [वसंततिलकावृत्त.] **गवाक्षवदनें**-खिडक्यांचीं तोंडें. **कौतुकें**-आनंदानें. **जलदसन्निध**-मेघाच्या जवळ. [ह्या श्लोकाच्यापुढें आणखी अर्धा श्लोक आहे.] **प** १० [ शार्दूलविक्रीडितवृत्त ] **तोयद**-मेघ. **वलय**-कडे. **उटज**-पर्णकुटी. **प.** ११ [शा वि.वृ.] **निर्भर**-आधिक्य. **नूपुर**-तोरड्या. **प.**१२ [ शा.वि.वृ. ] **निशाचरपति**-राक्षसांचा राजा. **आकंपित**-थोडें डोलविलेलें. **पल्लवांगुलि**-पल्लवरूप बोटें. **प.** १३ [ शा.वि वृ.] **व्यग्र**-उदास. **तृण**-चारा. **प.**१४ [शा.वि.वृ.]**हिमकर**-चंद्र.**आकाशस्पर्धि**-उंचीमध्यें आकाशाशी चढाओढ लावणारे. **बाष्पोदक**-अश्रु, **प.** १५ [ स्रग्धरावृत्त ] **सुस्निग्ध**-फार गंभीर. **आगम**-आगमन. **व्रज**-समुदाय. **नीप**-कळंबाचीं झाडें. **मृदुल**-मऊ.**पल्वल**-लहान तळें.**मेघागममुदित**-मेघाच्या आगमनानें आनंदित झालेला. **मयूर**-मोर. **व्रज**-कळप. **तंतु**-केसर. **शृंग**-पर्वताचें शिखर. **प.** १६ शार्दूलविक्रीडितवृत्त ] **रक्त**-तांबड्या. **कानन**-अरण्य. **क्षिति**-पृथ्वी. **धूमारुणें**-धूर लागून लाल झालेलीं **प.**१७ [शा.वि.वृ.] **वेतसी**-वेत. **पंपा**-या नांवाचें एक सरोवर. **प.** १८ [ शिखरिणी वृत्त ] **हेमघटिता**-सुवर्णाच्या. **रव**-शब्द. **प** १९ [ शार्दूलविक्रीडित वृत्त. ] **घटजलें**-घागरीच्या पाण्याने. **जवें**-वेगानें.**प.**२०[शा.वि वृ.] **मृगया**-शिकार, पारध. **प.** २१ [ शा. वि.वृ.]**नहुषाख्य**-नहुष ह्या नांवाचा. **महेंद्र**-इंद्र. **च्युत** भ्रष्ट. अगस्तीचा उदय झाला म्हणजे सरोवरें व दुसरे जलाशय यांतील उदक निर्मळ होतें अशी समजूत आहे. **प.** २२ [ शा. वि. वृ. ] **विमानपथ**-आकाशमार्ग. **मनोज्ञ**-सुंदर. **हवि**-होमद्रव्य. **रज**-रजःकण.**प.**२३ [वसंततिलकावृत्त] **शातकर्ण**-या नांवाचा ऋषि. **जलकेलिभू**-जलक्रीडेची जागा. **प्रथित**-प्रसिद्ध. **विधुबिंब**-चंद्रबिंब. **प.** २४ [ शार्दूलविक्रीडितवृत्त. ] **सौध**-मंदिर. **पुष्पकीं**-पुष्पक नांवाच्या विमानांत. **प.** २५ [ वसंततिलकावृत्त ] **ज्वलन**-अग्नि. **मुनि**-ऋषि. **प.** २६ [ वसंततिलकावृत्त. ] **सुतीक्ष्ण**-ह्या नांवाचा ऋषि. **सौम्य**—निरुपद्रवी, शांत. **प.** २७ [ शार्दूलविक्रीडित. ] **मौनी**-भाषण न करणारा. **प्रणतिला**-वंदनाला. **व्योम**-आकाश. **पुनश्च**-पुन्हा. **प.** २८ [ शा. वि. वृ. ] **सशुद्ध**-फार पवित्र. **अध्वर**-यज्ञ. **संतर्पिलें**-तृप्त केलें.**होमिलें**-जाळून घेतलें. **प.** २९[शा.वि.वृ] **पांथ**-प्रवासी.**क्षुद्बाधा**-भुकेची पीडा. **प.** ३० [शा.वि.वृ.] **मंदाकिनी**-भागीरथी. **प.** ३१ [शा.वि वृ.] **गंध**-सुवास.**ईषत्**-थोडासा.**पांडु**-शुभ्र. **वक्त्र**-तोंड. **प.** ३२ [शा.वि.वृ.] **शिक्षा**-देहदंड. **उद्दाम** बंधनरहित. **प.** ३३ [शा.वि.वृ.]**महासती**-परमसाध्वी-अनसूया. **सुरनदी**-गंगा,भागीरथी.

प. ३४ [ शा. वि. वृ. ] **वीरासन**—बसण्याचा एक प्रकार. **शाखा**—वृक्ष—**आसन**—वेदीरूपी आसन. **कंप**—हालचाल. **शून्य**—रहित. प. ३५ [ शा वि.वृ. **मुक्तायष्टि**-मोत्यांची काठी. **सरोजपंक्ति**—कमळांची ओळ. **श्वेता**-पांढरी. शुभ्र. **इंदीवर**—नीलकमल **कृष्णागुरू**—कृष्णचंदन. **चांदणी**-चंदनाच्या चूर्णाची. प. ३६ [शा.वि.वृ.] **तम**-अंधार. **चंद्रिका**-चांदणें. **मेघराजि**-मेघांची पंक्ति. **रंध्रांतुनी**—छिद्रांतून. **स्फुट**-स्पष्टपणें. प. ३७ [शा.वि.वृ.] **विभूति**—भस्म **जन्हुसुता**—भागीरथी. प. ३८ [शा.वि.वृ.] **गुहाख्य**—गुह ह्या नांवाचा. **मस्तक-भूषणें**—किरीट कुंडलें इ. अलंकार. प. ३९ [शा.वि वृ.] **स्रष्ट्याचें**—ब्रह्मदेवाचें. **मानस**—हें सरोवराचें नांव. हें सरोवर तिबेटांत आहे. **पानीयकेलि**-जलक्रीडा. **अव्यक्त**—ब्रह्म. प. ४० [ शा.वि.वृ. ] **उत्तरकोसल**—हें एका देशाचें नांव. **पुलिन**—वाळवंट. **उत्संग**—मांडी प. ४१ [ शा. वि. वृ. ] **धुनी**—नदी. **तरंग**—लाटा. **सुधांशु**—चंद्र. प. ४२ [शा. वि. वृ.] **रक्त**-लाल. **अवनिची**—पृथ्वीची. **रज**-धूळ. **वायुज**—मारुती. प. ४३ [ शा. वि. वृ. ] **अग्रीं**-पुढें. **अमात्यवर्ग**-मित्रमंडळ. **विलसे**—शोभतें.

## १८. रुक्मिणी आपल्या लग्नाची गोष्ट सांगते. पृ. ४५—४८.

प. १ **कौरव**—धर्मराज वगैरे. **यादव**—कृष्ण वगैरे. ' कोकिळ शुकसारिकांसि लाज पळविति ' म्हणजे आपल्या मधुरस्वरानें त्यांस लाजवितात हा भाव. प. २ **प्रभुपत्नी**-श्रीकृष्णाची भार्या. **ननांदा**—नणंदा. **अजातरिपु**—धर्मराज. प. ३ **वैदर्भी**—रुक्मिणी. ' दीनवत्सलें श्रीकृष्णें तुजला आंगें कैसें वरिलें ? ' असा अन्वय. प. ४ **कन्या**—मुलगी. **धन्या**—थोर, मोठ्या योग्यतेची. प. ५ **गेह**—घर. **हरि**—श्रीकृष्ण. **यश**—गुणानुवाद. **अमृत**—सुधा. प. ६ **हरिगुणगायक**-श्रीकृष्णाचें माहात्म्य सांगणारें. **मुद्रा**—आंगठ्या. **कंकण**—कडीं. **परिहार**—निवारण. प. ७ **दुखणी**—दोन खणांची. **नखेंदु**—नखरूप चंद्र. चंद्रकोरेसारखी पायांचीं नखें. **धरा**—जमीन. 'नखेंदु धरा खणी'—मन चिंतेनें ग्रस्त झालें असतां स्त्रियांच्या हातून नकळत कांहीं चिंतासूचक व्यापार होत असतात, त्यांपैकींच पदनखांचा संकोच करून जमीन उकरणें हा होय. प. ८ ' श्रीकृष्णाला दुहिता द्यावी' इत्यादि अन्वय. **गुरू**—वडील माणसें. **विचारणा**-विचार. **सुहिता**-विशेष कल्याणाची. प. ९ **श्रुत्यर्पण**—श्रुति+अर्पण—कान देणें. प. १० **साजणांमध्यें**—साही भावंडांमध्यें. **खोटा**—कपटी मनाचा. ' खोटा नव्हेची. परि तो मणिगोटा हरिचरितरसीं तो न भिजे' असा अन्वय. **मणिगोटा**—वाटोळें रत्न. अर्थात् पैलू पाडलेलें (संस्कृत) नव्हे. प. ११ **मोहरोगवैद्य**—मोहरूप रोगाला दूर करणारा वैद्य. **चैद्य**—शिशुपाल. प. १२ **सूळ**—बोलावणें. **क्ष्वेड**—विष. **तातविचार**—पित्याचा हेतु. **पांगूळ**—लंगडा; फिका; व्यर्थ.

**प. १३** आत्मघाताचे साधकबाधक विचार एका क्षणांत दहादां मनांत येत असा भाव. **प. १४ सुदीनमनें**-अत्यंत दीनमनानें, काकुळतीला येऊन. **प १५ खोटा** कृत्रिम. **भाव**-भक्ति. **लाखोटा**-पत्र. **प. १६ वसंततिलकावृत्तें**-वसंततिलक-छंदामध्यें. **सात मोजूनी**-मोजून सातच पद्यें. तींसुद्धां सावकाशपणें जुळवून नव्हेत. तर ' लिहितां लिहितां क्षणांत योजूनी '-लिहितां लिहितां जीं सुचली तीं. ह्यावरून राजकन्या रुक्मिणी हिचें शिक्षण व बुद्धिप्रभाव कसा होता, ह्याची उत्तम साक्ष पटते. **प. १७** ' वेद ज्याचे निश्वास ' इ० अन्वय, **निश्वास**-श्वासोच्छ्वासापासून उत्पन्न झालेले. **विश्वास**-सर्व जगाला. **ज्ञानप्रद्**-ज्ञान देणारे. **प. १८ सद्विप्र**-सत्+विप्र-सुशील ब्राह्मण. **आण**-शपथ. **प. १९ शाल्व**-एका राजाचें नांव. **मगधपतिसख** मगधदेशाच्या राजाचा मित्र. **मांडलें**-तयारी केली. **तद्बळजळनिधींत**-त्याच्या सैन्यरूप समुद्रांत. **आधि**-मानसिक दुःख, चिंता. **प. २० खळदर्पघ्न**-दुष्टांचा गर्व हरण करणारा. **नतचातक**-शरण आलेला हाच कोणी चातक पक्षी. मेघोदकाशिवाय अन्य उदक चातक पीत नाहीं, अशी कविकल्पना आहे. **दयासुधा**-दयारूप अमृत. **जलद्**-मेघ. **प. २१ गरळविलेपन**-विषाची उटी. **सुकृपणकृत**-अट्टल कृपणानें केलेले. **शुष्कोपचरण**-शुष्क+उपचरण-कोरडें आदरातिथ्य. ' दरिद्रातें कसें निववील ?' हा अन्वय. **प. २२ ध्वजा झाल्ये**-प्रासाद शिखरावर पताकेसारखी सतत उभी राहिलें. **पुर+ईक्षण+छद्में**-नगर पाहावयाचे निमित्तानें. **हरिदिक्**-इंद्राची दिशा, पूर्व. **द्वारवतीपथ**-द्वारकेचा रस्ता. **प. २३ सुगात्री**-उत्तम अवयवांची. **आधिभारभग्न**-दुःखाच्या ओझ्यानें दडपून गेलेलें आणि म्हणूनच कष्टी जें मन त्यासी रात्रि यष्टि ( आधार ) झाली हा अन्वय. **प. २४** ' प्राण जायासाठीं शतवार कंठी गोळा झाले ' हा अन्वय. **प. २५ यत्पदपद्मरजाचें**-ज्याच्या पदकमलाच्या रजःकणाचें. **प. २६ तों**-इतक्यांत. **प्रियकंठीं**-कृष्णाच्या गळ्यांत. **हे**-मला रुक्मिणीला. **सुखांत पाडावी**-सुखी करावी. **भाव**-हेतु. ' डावी भुजलता स्फुरली ( आणि ) ती कृपा करि ' असा अन्वय. स्त्रियांचा डावा डोळा, डावा हात, वगैरेचें स्फुरण होणें शकुनशास्त्रांत शुभप्रद मानलें आहे. **प. २७ मनें चिन्तेची बाज सोडली**-मनानें चिंता सोडली. **प. २८ ज्वरहरमात्रा**-ताप जाण्याचें औषध. **द्विज**-ब्राह्मण. **धन्वंतरि**-वैद्यराज. **बाळीं**-मुलावर. **प. २९ विप्रमुखश्री**-ब्राह्मणाच्या तोंडावरची टवटवी. **माधवागम** श्रीकृष्ण येतो असें. तो ऊठ म्हणे आणि मन गुरुपदासि लाग म्हणे, असा अन्वय. म्हणे हें क्रियापद उभयपदांकडे लावावयाचें-**प. ३० वत्से !**-मुली. **अर्थश्रवणें**-त्यांतील भावार्थ लक्षांत आणल्यानें. **उत्तमश्लोक**-उत्तम आहे कीर्ति ज्याची तो-श्रीकृष्ण. **प. ३१ ज्यां**-चिंता वगैरेना-**पालविलें**-बोलाविलें. कृष्ण आल्यामुळें माझी चिंता दूर झाली. पण शिशु-

पालादिक चिंताग्रस्त झाले असा भाव. प. ३२ **अंबा**-देवी. **कलीं**-कलियुगामध्यें. **नवरीती**-नवी चाल. प. ३३ **धांक**-भीति. **विरोन गेल्याचें**—गांगरून गेल्याचे. प. ३४ **विप्रस्त्री**-ब्राह्मणाची पत्नी. 'स्वस्त्री धात्री जननी विप्रस्त्री मंडळी न; ती पेटी; तींत मी मणी' असा अन्वय. प. ३५ **निवविली**-प्रसन्न केली. **जामाता**-जांवई. **शिवा**-अंबिका, पार्वती. प. ३६ **दावा**-वैर. **नेदावा**-कळूं न द्यावा. प. ३७ **जोडा**-उपमा. **भाग**--वांटा. **कोले** कोल्हे. **महाभाग**-महात्मा. प. ३८ **वायसाराती**-घुबड. **वायस**-कावळा. **अराति**-शत्रु. **सारा**-उत्तम. **नलिनी**-कमलिनी. **कैरविणी**-चंद्रविकासी कमलिनी. प. ३९ **शिशिरीं**-शिशिर ऋतूंत, थंडीच्या दिवसांत. **दरिद्र**-भिकारी, ज्यांस वस्त्र नाहीं तो. **मूर्त**-प्रत्यक्ष. प. ४० **आलि**-सखी. **सुमनोमाळा**-फुलांची माळा यास इ० हा अन्वय. **विधी**-संस्कार. प. ४१ **लवला**-वांकला, खालीं मान केली. **लव**-क्षण. **अंकीं**-मांडीवर. **कालवला**-डोल लागला, उचंबळला. प. ४२ **मुक्ता**-मोतीं. **काक**-कावळा. **नाद**-शब्द. **काना**-कानावर. **खगण**-पक्ष्यांची टोळी. **हरि**-सिंह. **निजभाग**—आपला वांटा **अतिधीर**-महा धैर्यशाली. **अबळ**—दुर्बळ, भेकड. **खळ**-दुष्ट. **यदुवीर**-कृष्ण.

## १९. वर्षाकाळ. पृ. ४८-४९.

प. १ **वर्षाकाळ**-पावसाळा. **पंचमऋतु**-पांचवा ऋतु-वर्षा. **अनिळ**-वारा. **मोकली**-पळवितो. सामान्यपणें वर्षारंभ चैत्रापासून समजतात, परंतु व्यापारी लोक तो कार्तिक शुद्ध प्रतिपदेपासून मानतात. कार्तिकापासून ऋतु मोजले तर वर्षाकाळ पांचवा ऋतु येतो. हाच ह्या ठिकाणीं इष्ट आहे. प. २ **जळराशी**-समुद्र. हाच कोणी एक **पारधी**-शिकारी. **पिटीत**-धावडीत. **सैरा**-हवातसा, स्वच्छंद ( कल्पना मोठी बहारीची आहे. ) **पारधी**-व्याध, शिकारी. व्याध नांवाचा एक फार तेजस्वी तारा आहे. याच्या पश्चिमेस एक मोठा तारकापुंज आहे त्याला 'मृग' अशी संज्ञा आहे. ह्यांत चार तारे चरणस्थानीं असून तीन मुखस्थानीं आहेत. पायांच्या मधोमध उदरस्थानीं तीन ताऱ्यांची बारीक रेषा आहे. तिला बाण असें म्हणतात. व्याधानें मृगावर हे बाण सोडले अशी कल्पना आहे. सूर्य मृगनक्षत्रांत आला म्हणजे मृग लागले असें म्हणतात. प ३ **इंद्रचाप**-इंद्रधनुष्य. प. ४ **सूर्यकिरणमृगसमुदाय**-सूर्यकिरण हाच मृगांचा कळप होय. प. ५ **पृथ्वीखंड**-भूप्रदेश. **शाळुंखा**-लिंगाच्या सभोंवार असलेला आकार. **शिवपिंडिका**-शिवाचीं लिंगें प ६ **कपोतक**-कबूतरें. **दर्दुर**-बेडूक **घोख**-घोष, शब्द. प. ७ **विद्युल्लता**-वीज. **सरिता**-नद्या. **माजले**-फुगून राहिले. प. ८ **अंकुरवसनें**--दूर्वारूप वस्त्रानें. **वेढिली**-आच्छादली. प. ९ **प्रमाण**-माप. **वोपी**-देतो.

**अयनांशें.**-उत्तरायण व दक्षिणायन ह्यांनीं. सूर्य उत्तरायणांत बाष्परूपानें आकाशांत उदकाचा संचय करतो व दक्षिणायनाच्या आरंभी पर्जन्याच्या रूपानें तें पाणी पृथ्वीवर सोडतो. यावर कवि अशी कल्पना करतो कीं, जणूं काय सूर्य व चंद्र हीं दोन मापें करून सगळ्या जगाला परमेश्वर अयनांशानें पाणीच मोजून देत आहे !

## २०. श्रीरामराज्याभिषेक. पृ. ४९-५२.

**प. १** [ मालिनीवृत्त ] **अनुज**-धाकटा भाऊ, लक्ष्मण. **दशमुख-अनुज**-बिभीषण. **पवनज**-मारुती. **यान**-वाहन. **प. २** ( मालिनी. ) **प्रभु**-रामचंद्र. **चिरजीवी**-चिरंजीव. सात माणसें चिरंजीव असल्याचें सर्वत्र प्रसिद्धच आहे. ह्यांच्या नांवाचा एक श्लोक आहे तो असा:—"अश्वत्थामा बलिर्व्यासो हनुमांश्च बिभीषणः । कृपः परशुरामश्च सप्तैते चिरजीविनः" यावरून अश्वत्थामा, बलि, व्यास, हनुमान्, बिभीषण, कृपाचार्य, आणि परशुराम हे सातजण चिरंजीव आहेत असें होतें. **वाटे**—मार्गामध्यें. **प. ४** ( वसंततिलकावृत्त ) **जव**—सातू. **पक्क**--शिजवलेलें. **स्थंडिल**—ओटा. **प. ४** ( मालिनीवृत्त ) **श्रवणीं**—कानानें. **अभिमुख**-सामोरे. **पुरजन**-नगरवासी लोक. **गुरु**-वशिष्ठ. **मस्तकांतीं**-माथ्यावर. **ध्वस्त**-नष्ट. **प. ५** ( शिखरिणीवृत्त. ) **नंदिग्राम**-स्थलविशेष. **प. ६** ( मालिनीवृत्त. ) **कनकमय**-सुवर्णमय. **पताका**—ध्वज. **वृंद**—समुदाय. **स्वर्णसंन्नाह**-सुवर्णाचा साज घातलेले. **प. ७** ( वसंततिलकावृत्त. ) **राजविलासमुद्रा**—राजलक्ष्मीचीं चिन्हें. **करुणासमुद्रा**—करुणेचा समुद्र जो रामचंद्र त्याला. **प. ८** ( मालिनीवृत्त. ) **पद्मा**—लक्ष्मी. **सुस्वभावा**-चांगला आहे स्वभाव ज्याचा तो. **स्व-भावा**—आपल्या बंधूला. **प. ९** ( स्वागता वृत्त. ) **उपपादी**-बोलला. **क्षितिसुता**-सीता. **पायीं**-पायानें, अनवाणी. **प. १०** (स्वागता वृ.) **नृत्य**-नाच. **कौतुकरीतीं**-आनंदानें. **प. ११** (पृथ्वीवृत्त.) **व्यजन**-पंखा. **चामरे**-चवऱ्या. **वीजती**-वारतात. **आतपत्र**-अबदागीर. **प. १२** (मालिनीवृत्त.) **सधनु**-धनुष्यासहवर्तमान. **जळझारी**-पाणी भरलेली झारी. **रामकांता**-सीता. **असिचर्म**-ढाल. **ऋक्षपाळ** जांबुवंत. **प. १३** ( मालिनी वृ. ) **उत्पलीं**-कमलामध्यें. **बंदी**-भाट. **प. १४** (मालिनी वृ.) **पुरीं**-पुरामधें. **नृपगृहीं**-राजवाड्यांत. **गुरुपत्न्या**-ब्राह्मणांच्या स्त्रिया. **माउल्या**-कौसल्या, सुमित्रा, कैकयी. **भावें**-भक्तीनें. **बंधुभावें**-बंधुप्रीतीनें. **प. १५** (स्वागतावृत्त.) **अवघियां**-सर्वांना. **धरातनया**-सीता. **प. १६** ( शिखरिणी वृत्त. ) **तनुप्राणन्यायें**—तनु व प्राण यांची जशी घट्ट मिठी आहे, त्याप्रमाणें. **माया**-प्रेम. **प. १७** ( मालिनी वृत्त. ) **उकलि**—सोडल्या. **कोदंडपाणी**-कोदंड म्हणजे धनुष्य ज्याच्या हातांत आहे, तो—श्रीरामचंद्र. **चतुःसिंधुपाणी**—चारी समुद्रांचें उदक. **त्रिदशगुरु**—देवांचा

गुरु. **वंशाब्धिचंद्र**-वंशरूप समुद्राला (चंद्र) आनंदित करणारा **प. १८** (वसंततिलका वृत्त.) **सुस्नात**—मंगलस्नान केलेला. **अंबर**—वस्त्र. **पद**—स्थान. **कमळासन**—ब्रह्मदेव. **प १९** ( उपजाति वृत्त. ) **धर्मवाटे**—धर्ममार्गाला. **प. २०** ( वसंततिलकावृत्त.) त्रेतायुगांतच कृतयुगाचा काळ आला असें जनांस वाटलें. **भरताग्रज**—राम. **प. २१** ( उपजाति वृत्त. ) **द्वीप**-बेट. **कामधेनु**-इच्छित वस्तु देणारी गाय. **प. २२** (मालिनी वृत्त ) **जरा**-वृद्धापकाळ. **आधिव्याधि**-दुखणींबाणीं. **प. २३** (द्रुतविलंबित वृत्त.) **एकवधूव्रत**—एकपत्नीव्रत. **मधुव्रत**—भ्रमर. **स्फुट**-थोडथोडें. **प. २४** (मालिनीवृत्त.) **निर्व्याज**—अकृत्रिम **प्रेमसंलाप**—प्रेमयुक्त संभाषण.

## २१. हंस नलाकडून दमयंतीकडे जातो. पृ. ५२–५४.

**प १** ( मालिनी वृत्त. ) **खग**—पक्षी ( हंस ). **गोपुर**—महाद्वार. **पवनगवाक्ष**—वारा येण्याची खिडकी. **जवशाली**—वेगवान्. **वेंघला**—चढला. **चंद्रशाला**—सौध, गच्ची. **वितत**—विस्तीर्ण. **प. २** (वसंततिलका.) **निडारीं**—दृष्टींत. **विलासवन**—क्रीडोद्यान. **सांद्र**—दाट. **साई**—झाडी. **प. ३** ( वसंततिलका. ) **मंडळाकृति**—वाटोळा. **भैमीमुखेंदुपरिवेष**—भैमी-दमयंती-तिच्या मुखचंद्राचें खळें. **प. ४** ( व. ति. वृ. ) **चपळपक्षपुटीं**—चंचल पंखांनीं. **धरेला**—जमिनीला. **उदेला**-उत्पन्न झाला. **वरांगना**-सुंदरी. **प. ५** ( शिखरिणीवृत्त. ) **कवयिता**-कवि. **प. ६** ( वसंततिलका वृत्त ) **हंसगमना**—हंसाप्रमाणें चालणारी. **वलय**—कंकण. **नूपुरनाद**—पैंजणांचा शब्द. **हे**—ती दमयंती. **प. ७** (व. ति. वृ.) **इंद्रदंती**—ऐरावत. **कृशोदरी**—सडसडीत बांध्याची. **निष्कंप**—न हालणारे. **प. ८** ( द्रुतविलंबित वृत्त. ) **गवसला**—सांपडला. **सखीजन**—मैत्रिणींचा समूह. **बुझावुनी**—भिववून. **प. ९** ( वसंततिलका वृत्त. ) **समीप**—जवळ. **सुधाकरमुखी**—चंद्रवदना, दमयंती. **प. १०** ( सवाई वृत्त. ) **विहग**—पक्षी. **परत्या**—माघाऱ्या. **नलगेच**—नकोच. **राहविला**—थांबबून ठेवला. **प. ११** ( वसंततिलकावृत्त. ) **रागेजली**—रागावली. **सावरिला**—खोचलेला. **प. १२** (व. ति. वृ.) **पद**—पाऊल. **मंद**—हळू. **प. १३** ( मालिनी वृत्त. ) **मदगजगमना**—मत्त हत्तीप्रमाणें चालणारें. **प. १४** (वसंततिलकावृत्त.) **चतुरसंमत**-चतुर लोकांस मान्य; मोठी चतुराईची. **सुतनु**-सुंदरी. **वनाळी**—वनपंक्ति. **सांवळि**-काळी. **युवतितुल्य**—त्या स्त्रीसारखी.

## २२. प्रपंचांतील आगणूक. पृ. ५४–५६.

**प. १ नागवणा**—भिकेस लावणारा. **करंटपणा**—मूर्खपणा. **खुणा**—लक्षणें. **प. २ वैभव**—ऐश्वर्य. **अरत्रींपरत्रीं**—इहलोकीं आणि परलोकीं. **प. ३ सर्वोत्तमासी**-परमेश्वराला. **प. ४ फलाहार**—फराळ. **संसारधंदा**—प्रपंचाचा उद्योग.

**सुशब्द**—गोड भाषण. ५ **व्यापार**—धंदा. **खबरदार**—दक्ष. **दुश्चितपणें**—बेसावधपणानें. **पोर ओढा लावी**—एखादें पोरसुद्धां फसवील. प. ६ **सावधान**—दक्ष. प. ७ **सदैवपणाचें**—भाग्यवंतपणाचें. प. ८ **बरेंपण**-मैत्री. प. ९ **तनेंमनें**—देहानें आणि मनानें. **झिजावें**—कष्ट करावे. प. १० **उरावें**—राहावें. **अंतरीं**—मनांत. प. ११ **विवरावें**—भेदावें; मनांत शिरावें. प. १२ **पतित**—भ्रष्ट. **पावन**—पवित्र. प. १३ **बोधाची**—उपदेशाची. **पाखांडी**—वितंडवादी. प. १४ **उदंड**—पुष्कळ. **प्रत्यय**—अनुभव. प. १५ **धक्केचपेटे**—टक्केटोणपे. **नीच**—उणे. **परावे**—शत्रु. प. १६ **जाणपण**—ज्ञातेपणा. **लीनता**—नम्रपणा. प. १७ **कष्ट**-श्रम. **सोशिती**-सहन करतात. प. १८ **उपाधीस**—श्रमाला, त्रासाला. **चेवला** च्युत झाला; मुकला. **समयीं**—प्रसंगीं. **खोटा**—फुकट, निकामी.

## २३. वैराग्यपर अभंग. पृ. ५६–५७.

**संत**—साधु. **सुकाळ**—समृद्धि. **याचक**—भिकारी. **वरो**—चांगलें. **पेठ**—बाजार. **परी**—प्रकार. **परतोनी**—मागें फिरून. **भेट**—दर्शन. **चुकलीया**—चुकामूक झालेल्या. **जीवनावेगळी**—पाण्यावांचून. **मासोळी**—मासा. **गोसावी**—संन्यासी; विरक्त **फजीती**—अपकीर्ति. **जयवंत**—विजयी. **तातडी**—गरज. **बिबुडी**—बमिोड. **कई**—कधीं. **भोज्य**—भोजनाचे पदार्थ. **प्रावर्णे**—वस्त्रें. **जीर्णे**—फाटकीं, जुनी. **योग**—गांठ; संबंध. **समान**—सारखें. **जरा** म्हातारपण. **कर्णमूळीं**—कानांत. **सावधान**—सावध. **घडी**—घटका. पूर्वी घड्याळें नव्हतीं. तांब्याचें पात्र करून त्याच्या तळाशीं एक बारीक छिद्र ठेवून तें पाण्यानें भरलेल्या भांड्यांत ठेवावयाचें तें बरोबर घटकेघटकेनें बुडून तळाशीं जातें. ह्या पात्राला ‘ घटका ’ असें म्हणतात. लग्नकार्यांतील मुहूर्तास अद्याप ही घटका घालण्याची चाल आहे. **कुळींची देवता**—कुलस्वामिनी. **परिमळ**-सुवास. **घ्राण**—नाक. **श्रवण**—कान. **पुतळा**—जड देह. **सूत्रधार**—आत्मा, परमेश्वर.

## २४. उज्जयिनी. पृ. ५७–५९.

प. १ (शिखरिणी वृत्त) **पुरी**—नगर, शहर **निरुपम**—अप्रतिम. **निर्जन**—ओसाड. ‘हें बघोनी या समयिं मम मन दुःखित होतें’ असा अन्वय. प. २ ( स्रग्धरा वृत्त. ) **हर्म्य**—धनिकाचा वाडा; हवेली. **प्रासाद**—देवालय किंवा राजवाडा. **नाट्यशाळा**—नृत्यशाळा. **चंद्रशाला**—गच्ची. **विपणि**—बाजार. प. ३ (मंदाक्रांता वृत्त) **नगरवनिता**—शहरांतील स्त्रिया. **यानीं**—वाहनांत. **पौर**—शहरवासी लोक. **वेषीं**—पोषाकांनीं—**राजपंथ**-राजमार्ग. प. ४ ( शार्दूलविक्रीडित वृत्त ) **पिक**—कोकिळ. **वापी**—पुष्करिणी. **चक्रांग**- चक्रवाक. **लता**—वेली. प. ५ (शार्दूलविक्रीडित वृत्त ) **तत्पर**—गढलेलें. **मानधन**—मान हेंच धन समजणारे. **तृण**—कसपट, गवत. **अर्थोत्पादक**-द्रव्यसंपादन करणारे. **खपले**—कष्ट केले. प. ६

(रथोद्धता वृत्त) **राजभक्तिवश**–राजनिष्ठेला वश झालेले; राजनिष्ठ.**नांदते**-नांदणारे. **प. ७** ( शार्दूलविक्रीडित वृत्त ) **काव्याभिज्ञ**–काव्यवेत्ते. **शाकुंतलाचा पिता**–शाकुंतल नाटकाचा कर्ता, कालिदास. **वाणीकंठमणी**–सरस्वतीच्या गळ्यांतील ताईत. **प. ८** (वसंततिलका वृत्त) **नव्यें**–नवीं नवीं. **सुवाणी**–रसाळ वाणी. **प. ९** (शार्दूलविक्रीडित वृत्त) पहिल्या चरणांत मेघदूत काव्याच्या संविधानकाकडे कवीचें लक्ष आहे. ह्या काव्यांत एका यक्षानें मेघाला दूत कल्पून आपल्या विरहिणी पत्नीला निरोप पाठविला आहे. **सीतेचा पतिला निरोप**–रघुवंश काव्याच्या चवदाव्या सर्गांत निर्जन वनांत सोडून दिलेल्या सीतेनें लक्ष्मणाबरोबर रामचंद्राला निरोप पाठविला आहे. त्याला अनुलक्षून हे शब्द आहेत. **रतीचा शोक**–कुमारसंभवाच्या चौथ्या सर्गांत मदनाप्रीत्यर्थ रतीनें विलाप केला आहे, तिकडे कवीचे लक्ष आहे. वरील तिन्ही काव्यांचा जनक कालिदासच आहे. **प. १०** ( शार्दूलविक्रीडित वृत्त ) **गर्वभरें**–फार गर्वानें **प्रभाव**–सामर्थ्य. **शोषिलीं**–आटवून टाकलीं. **कालमहिमा**–कालमाहात्म्य. **स्वच्छंदचारी**–मनःपूत वागणारा. **प. ११** ( भुजंगप्रयात वत्त. ) 'महाकाल' ह्या नांवाचें एक प्रसिद्ध शिवलिंग उज्जनीस आहे. **अवंती** उज्जनी. **प. १२** ( मालिनी वृत्त ) **अमूप**–पुष्कळ. **भुवन**–स्थान. **भोक्ता**–गुणज्ञ. **सुकविता**-उत्तम काव्य. **स्वर्गपंथा**–स्वर्गमार्गीला **प. १३** ( वसंततिलका वृत्त. ) विक्रमादित्य राजाचा धाकटा भाऊ भर्तृहरि, हा अत्यंत विरक्त होता. त्याचीं शृंगार, नीति, वैराग्य ही तीन शतकें सुप्रसिद्ध आहेत. भर्तृहरीला कोणी साधूनें एक उत्तम फळ दिलें तें त्यानें आपल्या प्रिय पत्नीस दिलें. तिनें आपल्या एका प्रिय पुरुषास दिलें. त्यानें त्याची एक आवडती वेश्या होती तिला दिलें. तिनें तें उत्तम फळ आहे असें पाहून राजास म्हणजे भर्तृहरीस आणून अर्पण केलें ! तेव्हां भर्तृहरीस पश्चात्ताप होऊन '**धिक्तां च तं च मदनं च इमां च मां च**' असे म्हणून तो राज्य सोडून अरण्यांत गेला अशी कथा आहे. **प. १४** ( शार्दूलविक्रीडित वृत्त ) हा श्लोक मूळ भर्तृहरीच्या शतकांतील एका श्लोकाचा अनुवाद आहे. **सामंतचक्रावृत**–मांडलिक राजांच्या मंडळाने परिवेष्टित. **स्थित**–बसलेल्या. ( १५ ) ( शा.वि. ) **नामैक्यें**–नामसादृश्यानें, एका नांवानें. सुधा हें नांव चुना आणि अमृत या दोन्ही पदार्थांस आहे. पण त्यांची बरोबरी नुसत्या नामसादृश्यानें कधीं तरी होईल काय ? कधींच होणार नाहीं असा भाव.

## २५. सत्यभामेचा रुसवा. पृ. ५९–६१.

**प. १** ( वसंततिलकावृत्त ) **विशारद**–निपुण. **स्वर्गपुष्प**–पारिजातकाचें पुष्प. पारिजातकाचें झाड पूर्वी मृत्युलोकांत नव्हतें. तें स्वर्गलोकींच होतें अशी कथा आहे. **त्रिजगन्निवास**–तीन जगांत आहे वस्ती ज्याची असा–कृष्ण. 'तें वासें भरोनि द्वारका सुगंधि करि.' असा अन्वय. **प. २** (भुजंगप्रयात वृत्त),

**जाय**-गेली. **कानीं**-कानावर **बुझावी**-समजूत करी. **लीला**-कृति; चरित्र. **प. ३** (द्रुतविलंबित वृत्त.) **लोळ**-लोळणें. **पवन-निश्चळ होय**-श्वासोच्छ्वाससुद्धां बंद झाला. **प. ४** (मालिनी वृत्त) **वृत्ति**-मनोवृत्ति. **मंचकीं**-पलंगावर. **दिव्य**-उत्तम. **सेजे**-बिछान्यावर. **प. ५** ( स्वागतावृत्त. ) **भवशोक**-संसारताप. **किंकरी**-दासी. **प. ६** ( भुजंगप्रयातवृत्त ) **शुभांगी**-सुंदरी. **आमुशीं**-आमच्याबरोबर. **शिराणी** आवड; प्रेम. **प. ७** (शिखरिणीवृत्त) **श्रीवत्स**-श्रीकृष्णाच्या वक्षस्थळावरील एक रत्नविशेष. **अंक**-चिन्ह. **घडी**-बसलेला जम-**बिघडली**-विस्काळित झाली. **घडी**-घटकाभर. **प. ८** (शिखरिणी वृ.) **विकल** विव्हल. **अधर**-ओंठ **धरापृष्ठीं**-भूपृष्ठावर. **ठक**-लबाड, कपटी. **अंबुजधरा**-हे कृष्णा ! **पक्षिगमना**-पक्षी-गरुड आहे वाहन ज्याचें अशा कृष्णा ! **प. ८** ( वसंततिलकावृत्त ) **भ्रूमंडळीं**-भोंवयांत. **अंगुलिभंग**-बोटें मोडणें. **प. १०** ( स्वागत्तावृत्त ) **मुनिवर**-महर्षि; नारद. **पुरींत**-आपल्या नगरांत. **वसावा**-राहावा. **प. ११** (भुजंगप्रयात वृत्त) **उतराई-होणें**. पार पडणें. **तरूचि**-वृक्षच. **प. १२** (भुजंगप्रयातवृत्त) **तुतें**-तुला. **आधि**-मनाचें दुःख. **कैटभ**-या नांवाचा दैत्य. **अरि**-शत्रु. **कैटभारी**-कृष्ण.

## २६. गृहिणीविरह. पृ० ६१-६३.

**प. १** (या उतान्याचें वृत्त शिखरिणी.) **अमरसदना**-स्वर्गलोकाला. **सरसा**-सुंदर. **हितगुज**-सुखदुःखाच्या गोष्टी. **प. २ अगाळिक**-अपराध. **करें**-हातानें. **प. ३ बुझालें**-नाहींसे झाले. **अवघिया**-सान्या. **मृगबाळें**-पाडसें. **झुरति**-दुःख करतात. **सुदती**-सुंदरी. **प ४ पाषाणीं**-दगडावर. विवाहामध्यें ' सप्तपदी ' म्हणून जो संस्कार होतो, त्यावेळीं वर वधूच्या हातास धरून दगडाच्या पाट्यावर चढतो आणि त्याप्रमाणें सात पावलें चालून झालें म्हणजे उभयतांचें ऐक्य झालें असें समजतात. त्या विधीला 'सप्तपदी' असें म्हणतात. त्याला अनुसरून ह्या श्लोकांत दुसरा चरण आहे. **प. ५ अलाप**-गायन. **निमाली**-नष्ट झाली. **प. ६ विद्युल्लेखास्फुरण**-विजेची चमक. **सुरेंद्र**-इंद्र. **मंत्रभ्रष्ट**-सल्ला न ऐकणारा. **क्षितिपति** राजा. **प. ८ भूमीवर**-मृत्युलोकीं. **सुरपदीं**-देवांच्या पदाला. **संबोधनपदीं**-हाक मारण्यानें. **धरणितळधूळींत**-पृथ्वीवरच्या धुळींत. **दिवस्थ**-स्वर्गवासी. **प. ८ पूर्णा**-संपन्न. **अणुसम**-रतिमात्र. **अलंकारीं**-भूषणांनीं. **साजे**-शोभत होती. **पहिला रस**-शृंगार. **पद्माक्षी**-कमलनयना. **सुकविता**-उत्तम काव्य. **प. ९ सुधातुल्य**-अमृतासारखें. **मृगाक्षी**-मृगनयना. **मांगल्यप्रदविधी**-मंगलदायक संस्कार. **विधात्री**-करणारी. **कुंदरदना**-कुंदाच्या कळ्यांप्रमाणें आहेत दंत जीचे ती.

## २७. अंतीं एकटाच! पृ. ६३.

**चक्रवर्ति**–सार्वभौम. **लेखे**–हिशेब, मोजदाद. **निमाले**–नष्ट झाले. **एकसरें**–एकामागून एक. **पुण्यशील**–पुण्यवान्. **अधोगती**–दुर्गतीला. **साचाचियेपरी**—अगदी खऱ्यासारखें. **दुराचरी**–दुर्वर्तनी.

## २८. रजनी आणि उषःकाल. पृ. ६३–६५.

प. १ **कोंदली**—भरली. **गुल्म**—झुडूप. **निशाचरीं**—रात्रीं संचरणारे. **कक्षीं**—सभोंवतीं. **वोळकंबलीं**—टांगून घेतलेली. प. ३ **पाळे**—समुदाय. **धुमस**–धुडकूस. **गदारोळें**—किंकाळ्यांनीं. **भंबाळें**–भकभकीत. प. ४ **भ्यासुरवेषीं**—भयंकर वेषांचीं. **अशुचि**–अमंगल. प. ५ **दिवाभीतांचे**—घुबडांचे. **घुंघाट**–घूत्कार. **भालू**—कोल्हीं. **सैराट**—स्वैर, स्वच्छंद. प. ६ **आर्तस्वरीं**–रडण्यानें. **कुमुद**–चंद्रविकासी कमल. **मस्तकमणितेजाविखारी**–मस्तकांत मणि असल्याचें तेज पडलें आहे असें विखारी सर्प. प. ७ **निधानें**–जमीनींत पुरलेले ठेवे. **चारिया**–संचारास. पुरलेल्या द्रव्याच्या संबंधानें प्राचीनकालीं कांहीं निराळेच समज होते. पुरलेलें द्रव्य रात्रौ स्थलांतर करतें व तें करतांना त्याचा दिव्य प्रकाश पडतो. शनवारीं घुबड मारून त्याच्या तेलाचें अंजन करावें आणि तें पायाळू मनुष्याच्या डोळ्यांत घालावें म्हणजे तें द्रव्य कोठें आहे तें त्याला दिसतें. त्याच्या मनांत ज्याच्याकडे जावयाचें असतें, त्याला ते 'मैं आऊं?' 'मैं आऊं?' असा प्रश्न करतें. इत्यादि जे समज त्या कालीं चालत होते, त्यांस अनुलक्षून ह्या पद्याचा चरण रचलेला आहे. ' येवो ' हें पद ' मैं आऊं ' ह्याचेंच दर्शक होय. प. ८ **कांबळी**–घोंगडी. **आप्तत्वें**–ममतेनें. प. ९ **बळिया**–बलाढ्य. प. १० **जननी**–माता, कुंती. **माद्रीकुमर**–नकुल व सहदेव. प. ११ **ध्रुवमडळा**–उत्तरध्रुवाचे नक्षत्रसमूहास. **याम्य**–दक्षिण. प. १२ **मातङ्गा**-मदोन्मत्त. प. १३ **झडपाआड**-तडाक्यासरशीं. **जुंबाडें**-भेंडोळीं. प. १४ **अंगवायो**–अंगापासून निघणारा वायु. प. १५ **शेष**–बाकी उरलेल्या. **क्षाळिलें**-धुतलें. प १६ **भार्गवाचार्य**-शुक्राचार्य. **वात**-वायु. प. १७ **कुमुदीं**–चंद्रविकासी कमलांनीं. **षट्पद**–भ्रमर. **कोकनद**–रक्तकमळ; हें सूर्यविकासी असतें. प. १८ **काका**—'का का' असा. **उलूक**—घुबड. प. १९ **मुक्ताफळें**–मोत्यें. **अरुण**–लाल, पक्षीं अरुणोदयरूपी. **नाहींच केली**–नाहींशीं केली. प २० **व्योम–नर्मदा**–आकाशरूप नर्मदा नदी. **सहस्रकर**–सूर्य; कार्तवीर्यासही सहस्र हस्त होते म्हणून येथें श्लेष आहे. कार्तवीर्यानें एकदां नर्मदाप्रवाह अडविला होता अशी कथा आहे. –प. २१ **सोहऽमस्मि**–'तोच मी' तें परब्रह्मच मी. प. २२ **शाक्त**—शक्तीची (देवीची) उपासना करणारे. **सौर**–

सूर्याची उपासना करणारे. प. २३ **प्रातर्होम**–सकाळची आहुति. **अग्निहोत्री** –अग्निहोत्र बाळगणारे; अग्निहोत्र हा एक नित्य हवनाचा प्रकार आहे. **सुनेमें**– उत्तम नियमानें.

## २९ सुभद्राहरण. पृ. ६५–६८.

प. १ **निजमातुलकुल**–अपल्या आजोळचे कुल **वृत्तांत**–हकिगत. प. २ **हलधर–हल**–नांगर धरणारा तो, बळराम. **धृतराष्ट्रसुत**–दुर्योधन. प. ३ **अचक्षु**–आंधळा. **श्रुति**—वेद. **राम**-बळराम. प. ४ **तीर्थस्नायी**–तीर्थ-स्नान करणारा. **सुकृतें**–पुण्याईनें. **ते**—ती सुभद्रा. प. ५ **त्रिदंडी**—तीन दंड धारण करणारा. **नियति**-दैव. प. ६ **वंचाया**–फसविण्याकरितां. **कंचा** –कोणता. प. ७ **वार्षिक**–वर्षाकाळचे. **सपर्यंत**–पर्यंत म्हणजे मर्यादा, ती ज्यास आहे असा; टाकतां येण्याजोगा. प. ८ **समाधियोग**–ध्यान. **सक्ति**–प्रीति, आसक्ति. **पौर**–नगरवासी लोक. प. ९ **ब्रह्मण्य**–ब्राह्मणभक्त प. १० **स्वगेहास** आपल्या घरीं. **माधवास**–श्रीकृष्णाला. **हास**–हास्य. प. ११ **निजाग्रज**–आपला वडील बंधु. **यति-हस्तींचा**–संन्याशाच्या हातांतला. **कवळ**–घास. प. १२ **अवसर**–संधि **भीमानुज**–अर्जुन. प. १३ **दास**–भक्त–अर्जुन. **अनुमोदन**–संमति. ह्या आर्येत 'द' कराची पुनरावृत्ति फार उत्कृष्ट साधली आहे म्हणून अनुप्रास अलंकार आहे **दारकरीति**–दारक–मूल–बाल-स्वभाव, अज्ञता. **वरी**–वरवर, बाह्यात्कारीं. प. १४ **गुह्य**-गुप्त. प. १५ **पर्व**–पर्वणी. प. १६ **शिबिका**–पालख्या. **वृष्णिदार**–यादवांच्या स्त्रिया. **यदुभट** –यादववीर. **धरा**–जमीन, पृथ्वी. **हाले**–कांपूं लागली. **यन्मुखसुधाकरें**–तिचें मुख हाच कोणी एक चंद्र त्याच्या योगानें. **क्षोभे**–उचंबळून आला. चंद्रदर्शनानें सागरास भरती येते हें सर्वप्रसिद्धच आहे. त्याच गोष्टीवर उपमेचा कटाक्ष आहे. प. १८ **पाटीं**-पाटावर. **सुचिरक्षुधित**-फार काळचा भुकेलेला. प. १९ **समयज्ञ**–समय जाणणारा. **तूण**–भाता. **कपटयतिकृतात्यनर्थ**–ढोंगी संन्याशानें केलेला घोर अनर्थ. प. २० **मराल**–हंस. प. २१ **शशकिशोर**–सशाचीं पिलें. **भीमा**–मोठमोठ्या. **वल्गा**–वल्गना. **आटोपा**–पुरे करा. प. २२ **दटावुनी**–भिववून. **वणिक्**–व्यापारी. **सार्थ**–जमाव, काफला. प. २३ **कैरविणी** –चंद्रविकासी कमलिनी. **बिसिनी**–सूर्यविकासी कमलिनी. **गौरविता**–आदर-सत्कार करणारा. प. २४ **सत्क्रिय**–कर्मनिष्ठ. प. २५ **बोभाट**–गाजा वाजा-**दस्यु**–चोर. **भाट**–स्तुतिपाठक. प. २६ **प्रस्फुरदधरदल**–कांपत आहेत ओंठाचे भाग ज्याचे असा. **कपटपटु**–कपटांत निपुण. **पटांत**–वस्त्रांत. प. २७ **वत्सा**–सुभद्रा. **धर्षण**–बलात्कारानें नेणें. **दंड**–शिक्षा. **उत्सव**–मौज. प. २८ **अर्णव**–समुद्र. **संध्या**–सायंकाळ. **राग**–रंग. **सुरंजित**–उत्तम रंगलेला. **शरदभ्र**–शरदृतूंतला ढग. प. २९ **कोपज्वरभरकंपित**–क्रोधरूपी मोठ्या

ज्वरानें कांपणारा. **शोण**-लाल. प. ३० **विनयनतकाय**-नम्रतेनें वांकलें शरीर ज्याचें असा. **वृष्णिराय**-यादवराज श्रीकृष्ण. प. ३१ **सह-भव**-स्वाभाविक, स्वभावसिद्ध **दीनसुख**-दीनांचा कैवारी. **भव्य**-कल्याण प. ३२ **वळलें**-अनुकूल झालें. **मत्पद**-माझे पाय. **आदान**-संकट. प. ३३ **वरा**-नवऱ्याला. **प्राणाधिक**-जीवापेक्षांही अधिक. **मदंघ्रिच्या**-माझ्या चरणाच्या. **आणा**-शपथा. प. ३४ **शासनभय**-शिक्षेची भीति. **ख्यात**-नामांकित. **पारिबर्ह**-राजचिन्हें. प. ३५ **भूषा**-अलंकार. **भगीरथ**-भागीरथी भूमीवर ज्यानें आणली तो. प. ३६ **तर्णक**-गोवत्स, खोंड. **अनुचर**-सेवक. **परसुखकर**-परम आनंद देणारी. **लोकपथ**-जनरीति.

## ३० शिवधनुर्भङ्ग व सीताविवाह. पा० ६९-७१.

प. १ ( शार्दूलविक्रीडित. व ) **माजी**-कमरेला. **सजी**-लावली. **कशी**-आवळली. प. २ ( शा० वि० ) **मृदुभा**-कोमलकांति. **चित्रनिभा**-चित्रासारखी स्तब्ध. प. ३ ( शा० वि० ) **उफाळला**-उसळला. **वेतंड**-हत्ती. **धीरधिंग**-दांडगा. **मृगाक्षी**-हरणासारखे डोळे आहेत जीचे ती-सीता. प. ४ ( शा० वि० ) **घंटावळी**-घंटांची माळ. **गुण**-दोरी. प. ५ (स्रग्धरा) ' लीलाभूभृल्ललाम '-राजेलोकांत सहज शोभणारा. **घोष**-नाद. **प्रतिनिनद**-प्रतिध्वनि. प. ६ ( वसंततिलका वृत्त. ) **विद्युल्लता**-वीज. **भूमितटीं**-जमिनीवर. **खुटोनि**-तुटून. **नाद**-शब्द. **टाळी बसे**-कानठळ्या बसल्या. प. ७ ( व० ति० ) **गौतमपुत्र**-शतानंद. **गाधेय**-विश्वामित्र. प. ८ ( व० ति० ) **लाघवानें**-चपलतेने **सुरसेक्षणानें**-सुंदर दृष्टीनें. प. ९ ( व० ति० ) **गिरा**-वाणी. **राजे**-शोभतो. प. १० ( व० ति० ) **दोर्बल**-बाहूंचें सामर्थ्य. **भाटिवकी**-स्तुतिपाठकता. प. ११ ( शार्दूलविक्रीडित ) **संतोष**-आनंदानें. **व्याघ्रकडासनें**-व्याघ्रांबरें. **कृष्णाजिन**-मृगचर्मे. **शतें**-शेंकडे. प. १२ ( शा० वि० ) **सौधतटीं**-गच्चीवर. **धटी**-वस्त्र. प. १३ [ मालिनी वृत्त. ] **सोपानमाला**-जिन्याच्या पायऱ्या. प. १४ ( मालिनी ) **देवर**-दीर. **रंग**-सभास्थान. **धुनी**-नदी प. १५ (मालिनी) **अतुर**-आतुर. **अपांग**-कटाक्ष. **योगी०**-योग्यांच्या हृदयस्वरूप आकाशांतील चंद्राला. प. १६ **अमलांगी**-गौरवर्ण. **राजबाळी**-राजकन्या. **सुखउमाळा**-आनंदाची उकळी. प. १७ ( शार्दूलविक्रीडित वृत्त. ) **स्मरसा**-मदनासारखा. **गरसा**-विषासारखा. **चित्सारसा**-चैतन्याच्या गाभ्यासारखा; पूर्ण चैतन्यघन. प. १८( शा० वि०) **अळुमाळ**-क्षणभर. **वेल्हाळ**-सुंदरी. **मदालसा**-हर्षोन्मादानें जिची गति मंद झाली अशी. **कल्लोळ**-गडबड.

## ३१. वयाच्या तीन अवस्था. पृ. ७२.

**वरुषें**–वर्षें. **बारे**–खेपा, पाळ्या. **बालेधोंडी**–होळीच्या तिठ्यावरील मोठाले वाटोळे दगड. **मुंडासा**–पागोटें. **अटोनी वेटोनी**–चापून चोपून, पट्या बसवून. **म्हैसा**–रेडा. **टवाळी**–कुचेष्टा. **श्लेष्मा**–कफ.

## ३२. सीताशुद्धि. पृ० ७२–७४.

**आज्ञापीत**–आज्ञा केली. **पाजळा**–पेटवा. **काष्ठपर्वत**–लांकडाच्या राशी. **निराळा**–आकाशाला. **चिंतातुर**–चिंताक्रांत. **विदेहनंदिनी**–सीता. **आरोळी**–हाहाकार. **कपिमंडळी**–वानरसेना. **कढों लागले**–खवळले. **रिचवती**–पतन पावती. **घवघवीत**–ताजीच्याताजी. **चिच्छक्ति**–चैतन्य-देवता **सौमित्री**–लक्ष्मण. **ठाकिला**–राहिला. **कोदंडपाणी**–रामचंद्र. **वामांकावर**–डाव्या मांडीवर. **नवमेघरंग**–नवीन ढगासारखा रंग ज्याचा असा. **जयजयकार**–जयघोष.

## ३३. उत्तमगुणसंकीर्तन. पृ० ७४–७५.

**विवेचना**–सारासार विचार. **वीट**–कंटाळा. **पुरुषार्थ**–प्रौढी. **निखंदूं नये**–निंदूं नये. **शोधिल्यावीण**–विचार केल्याशिवाय. **संचरूं नये**–शिरूं नये. **ग्वाही**–भरंवसा. **दुश्चितपणें**–गैरसावधपणानें.

## ३४. ताटकावध. पृ० ७५–७७.

**उल्हासें**–आनंदानें. **अवज्ञा**–अवमान. **विखार**–सर्प. **विकट**–विक्राळ. **तद्वधार्थी**–तिचा वध करूं इच्छिणारा. **विंदान**–कौशल्य. **जिव्हारीं**–काळजाला. **रांगोळी**–पीठ. **उचंबळत**–भरती आली. **नरनारी**–स्त्री-पुरुष. **कौशिक**–विश्वामित्र. **ऋषिवृंदें**–ऋषिमंडळांनीं.

## ३५. देवाजवळ मागणें. पृ० ७७–७८.

**सांगाती**–सोबती. **दुरितें**–पातकें. **बधिर**–बहिरा. **त्राहे**–रक्षण कर. **आणीकांची**–दुसऱ्याची. **पवाडे**–गुणानुवाद. **पट**–ताम्रपट, सनद. **वनमाळी**–भगवंता. **विकरा**–विक्रय. **भूतांचा**–प्राणिमात्राचा. **विसर**–विस्मृति.

## ३६. स्फुट पद्यें. पृ० ७८–८१.

**हृत्कासारीं**–हृदयरूप सरोवरांत. **सारज्ञ**–तत्त्ववेत्ते. **असूयोज्झित**–असूया+उज्झित–निर्मत्सर. **काव्यपद्म**–काव्यरूप कमल. **मकरंदसद्म**–रसांचें घर. प. ३ **कुलीनतोचित**-**कुलीनता+उचित**–कुलीनपणाला योग्य. प. ४ **गजमुक्ताफळ**-हत्तीच्या गंडस्थळांतील मोतीं. ( हत्तीच्या गंडस्थळांत मोतीं असतें अशी कवि-कल्पना आहे. ) **कवळभक्षिता**–घास घेणारा. **हरि**–सिंह. प. ५ ( शार्दूलविक्रीडित ) **सचिंत**–चिंताग्रस्त. **साकेतीं**–

अयोध्येमध्यें. प. ६ ( स्रग्धरा ) **सच्चेतस्**-साधुसंतांचीं मनें. **कौरवांतें**-कमळांस. **विकच**-प्रफुल्लित. **अज्ञानध्वांत**-अज्ञानरूपी काळोख. **पयोराशि**-समुद्र. **काव्येंदु**-चंद्रासारखें आल्हादकारक काव्य. **खळ०**-दुष्टविरहिजन. **धूमकेतू**-शेंडेनक्षत्र, नाशक. प. ७ **प्रणति**-नमस्कार. **भवानी**-पार्वती. **महामोहमहिष**-महामोहरूप रेडा. प. ८ **विवाहमंगलीं**-लग्नाच्या मंगल प्रसंगीं. प. ९ **तुका**-तुकाराम. **तुकासि**-तुलनेला. प. १० **सूक्तिश्रवणें**-उत्तम वाणी ऐकण्यानें. **वामन**-वामनपंडित. **वेणुसाचि**-जणों काय मुरलीच. प. ११ **पिकतो**-उत्पन्न होतो. **पिक**-कोकिळ. प. १२ **हरिहननकाज**—सिंहाला मारण्याचें काम. **विधु**—चंद्र. प. १३ **धवलांबर**-पांढरें शुभ्र वस्त्र. **डसे**-चावतें, नाश करतें प. १५ **विषलता**-विषवल्ली. **सोमलता**-सोमवल्ली. **पियूषवल्लि**-अमृतवल्ली. **सोमलता**-सोमलपणा, सोमलाचे गुण प. १६ **निपट**-निखालस. **निकर**-समूह. प. १७ **गाधजला**-उथळ पाण्याची. **विवेकरीतींत**-सदसद्विचार करण्याच्या पद्धतीमध्यें. प. १८ **सन्नमनीं**-साधुसंतांना नमन करण्यांत. **केंडू**-नाहींसें करो. **वस्तु**-दुसऱ्याची जिन्नस. **केंडी**-फेकून देतो. प. १९ **रंगावें**-शोभावें. **दीनें**-गरीब. **कर्षक**-शेतकरी. **हळ**-नांगर. प. २० **स्पर्शमणि**-परीस. प. २१ **तप्त**-तापलेले. **हळहळ**-हालाहल विष. प. २२ **व्यसनसागरीं**-संकटरूपीं समुद्रांत. प. २३ **मदकर्दमींहि**-गर्वरूप चिखलामध्येंसुद्धां. **चरणतळ**-पायाचा तळवा. प. २४ **इंद्रियलालन**-इंद्रियाचे लाड. प. २५ (शा. वि.) **संस्कृतीं**-संस्कृत भाषेमध्यें. **हानि**-तोटा. **अन्यकविहीं**-दुसऱ्या कवींनीं. **प्राकृतीं**-प्राकृत भाषेमध्यें. **गुण**-दोरा. **कार्पासगुणें**-कापसाच्या दोऱ्यांनें. **प्रभेला**-तेजाला. **उणें**-कमीपणा. प. २६ ( स्रग्धरा ) **गीर्वाणें**-संस्कृत भाषेनें. **अचतुर**-अज्ञ. **शिष्ट**-शहाणे लोक. **गोक्षीर**-गायीचें दूध. **कार्तस्वर**-सुवर्ण. **मणि**-हिरा. **चषक**-पात्र. **सारज्ञ**-रसिक. **पलाश**-पळस. **दलपुटक**-द्रोण. प. २७ **प्रसू**-माता. **आली**-सखी. ( पंताच्या वडिलांचें नांव रामचंद्र व आईचें नांव लक्ष्मी असें होतें ). **सत्यवती**-व्यासाची माता. **कीं**-कारण. **सुतमुखीं**-मुलाच्या अर्थात् मोरोपंतांच्या मुखांत (सत्यवती व लक्ष्मी ह्या मैत्रिणी झाल्या असें म्हणण्याचें कारण असें कीं, दोघींच्याही मुलांनीं भारतकीर्ति गायन केली. ) प. २८ **ज्वरित**-ताप आलेला मनुष्य. **घूक**-घुबड. प. ३० **तापद**-ताप देणारा. **प्राज्ञ**—शहाणा मनुष्य. प. ३१ **सामें**—सामोपचारानें. **लकुच**—एक प्रकारचें फळ. प. ३२ **बालिश**—मूर्ख. **सुकवी**—ज्ञाता. प. ३३ **सेव्य**-ग्राह्य. **सदुपदेश**-सद्बोध. **सुराग्रह**-मद्यप्राशन. प. ३४ **निजहितपथासि**-आपल्या कल्याणाच्या मार्गाला. **धनद**-कुबेर. प. ३५ **कुलज**-कुळवान्. **नरवर**-पुरुषश्रेष्ठ. **स्वयशःप्रकाश**-आपल्या कीर्तीचा

विस्तार. प. ३६ **संस्कार**–सोळा संस्कार, विधि. **लोपें**–लोपल्यानें, न घडल्यानें. **शुद्धि**–मनाचे निर्मलत्व. **सदधिक्षेपीं**-अधिक्षेप–उपमर्द–साधूंचा उपमर्द करण्याविषयीं. प.३७ **पण**–परंतु. **क्षमणें**-क्षमा करणें. **प्रणति**–नमस्कार. प. ३८ **अरिचीहि**–शत्रूचीसुद्धां. **संत**–साधु. **जंतुचा**–प्राण्याच्या. प. ३९ **भूतीं**- प्राणिमात्रावर. **नीट**–चांगला. प. ४० **रक्षावी**–रक्षण करावा. **पूर्वजांची**–वाडवडिलांची.

## ३७. दुष्यंत व शकुंतला यांची भेट. पृ० ८२–८३.

प. १ **गुणैकमूर्ति**–गुणांचाच पुतळा. **आगळा**–श्रेष्ठ. प २ **महींद्र**–पर्वत. **सुरेंद्र**–देवेंद्र. प. ३ **वर्णसंकरकारी**–वर्णसंकर करणारे. प. ४ **सकलवर्ण**–साऱ्या जाती. **विहिताचारें**–आपापल्या धर्मानें. प. ५ **अकालमरण**–भलत्यावेळीं मरण प. ६ **वोपी**–देतो. **मांत्रिक**-मंत्रविद्या जाणणारा. **श्रीविद्या**–विद्या देवी. प. ७ **धरातुल्य**-पृथ्वीसारखा. **अक्षोभ**–शांत. प. ८ **प्रहरण**-प्रहार. **भूपालचूडामणी**–राजरत्न. प. ९ **लोट**–प्रवाह. **संघात**–समुदाय. प. १० **वाजी**–घोडा. **वारण**–हत्ती. **पदाती**-पायदळ. **सेनावसन**–सेनारूप वस्त्र. प. ११ **महागिरी**–मोठा पर्वत. **तुंबलीं**–भरलीं. **सरितासरें**–नद्या, सरोवरें. प. १२ **डांगें**–वनें. **निर्झरोदक**–झऱ्याचें पाणी. प. १३ **दिनकर**–सूर्य. **छाये**–सावलीखालीं प. १४ **भर्जित**–भाजलेलें. **अभर्जित**–कच्चें. प. १५ पुढारी–पुढें. **कश्यपारण्य**–कश्यप ऋषींचें वन. प. १६ **देवतटिनी**–भागीरथी. **तरंगलिंगें**–तरंगरूपी शिवलिंगें. प. १७ **निसंग**–कोणी बरोबर न घेतां. **प्रवेशे**–शिरला. प. १८ **अवलोकुनि**–पाहून **नृपसत्तम**-राजाधिराज **रमणीय**–सुंदर. प. १९ **निकटीं**–जवळ. **पर्णकुटी**–झोंपडी. प २० **इंदिरावेशें**–लक्ष्मीस्वरूपानें. **लावण्यकालिका**–सौंदर्याची कळी. **प्रगटली**–बाहेर आली. प. २१ **कनकलतिका**–सोन्याची वेल. **सौदामिनी**–वीज. प. २२ **मुनीश्वरदुहिता**–महर्षींची कन्या. **धरित्रीकांता**-राजाला. **ओपिलें**–दिलें. प. २३ **स्वागत**–' या ' असें म्हणणें. **बहुमानीं**–अत्यंत सन्मानानें. **कुशलवृत्त**-खुशाली. प. २४ **दर्शनें**–भेटीनें. **नामस्मरण**–नामज्ञान. प. २५ **गोष्टी**—भाषण. **चमत्कारला**-आश्चर्य पावला. **वृद्ध**–प्रौढ. प. २६ **चक्रवर्ती**-सार्वभौम. **मूर्ती** – देह **सुजाण**—चतुर प. २७ **ममागमन**—माझें येणें. **विलंबें**—उशिरानें. **कीं**—किंवा. **अविलंबें**—लौकर. प. २८ **विवेकमूर्ती**—जणूं मूर्तिमंत विवेकच. **शीघ्रगती**-लौकर. प. २९ **स्थानीं**–ठिकाणीं. **कामना**–मनोरथ. **निर्धारें**–निश्चयानें.

## ३८. जनकाच्या घरीं परशुरामाचा सत्कार. पृ. ८४.

प. १ **रणक्षेत्रीं**-समरांगणांत. **सवेंचि**-बरोबरच. **तीन सप्तकें**-एकवीस. **निःक्षेत्री**-निक्षत्रिय. **आज्ञेवरी**-आज्ञेवरून. प. २ **ब्रह्माधिकारी**-ब्रह्मवेत्ता. **एकात्मता**-पूर्ण ऐक्य. प. ३ **राहविलें**—ठेवून घेतलें. **अपार**-असंख्य. प. ४ **भीतरीं**-आंतल्या बाजूस. प. ५ **चोखडें**-उत्तम. **परवडी**-मेजवानी. प. ६ **रसस्वाद**-पक्वान्नाची गोडी. प. ७ **साधनेसीं**-सर्व वाढून झाल्यानंतर. **लवण**-मीठ. **अपूर्णपण**-कमीपणा. प. ८ **स्वयेंचि**-आपणच. **आंचवलें**-मुकलें. प. ९ प. ९ **फळाशा**-फलाची इच्छा. **फोडी**-तुकडे. **वासना**-इच्छा. **परिपक्व**-पिकलेला. **स्वलीला**-आपल्या लीलेनें. प. १० **अहंकार**-गर्व. **सोऽहं**-तें परब्रह्म मीच. **गाळीव**-गाळून घेतलेला. **तांबूल**-विडा. प. ११ **निजसार**-गाळीव अर्क. **खदिरसार** खेराचें सत्त्व, कात. प १२ **चंदन**-गंध. **सुखसंपन्न**-सुखयुक्त; प्रसन्न.

## ३९. भरत आणि कुशलव. पृ० ८४-८९.

प. १ **वीरमणी**-उत्कृष्ट योद्धे. **विष्टपाक्रमणीं क्षम**-विश्वाला पादाक्रांत करण्याला समर्थ. **संकुल**-भरलेलें. **भूमिव्योमांसि**-भूमि व आकाश यांस. **भारार्त**-ओझ्यानें कष्टी झालेलें. **क्षरती**-गळतात. **मदोदक**-मदोन्मत्त हत्तीच्या गंडस्थळांतून झिरपणारा स्राव. **कज्जलाभ**-काजळासारखा काळा भोर. **भूगत**—पृथ्वीवर उतरलेले. **मुग्धाजन**-तरुणी. **कौतुक**—आश्चर्य. प. ४ (शा. वि.). **चापी**-चाप धारण करणारे. **रुक्म**-सुवर्ण. **कांड**-बाण. **कृपाण**—तरवार. **गदी**—गदा धारण करणारे. **चर्म**-ढाल. **किरीट**-मुकुट. **अंगद**-बाहुभूषण. **चलत्क्षोणीध्र**-चालते पर्वत. **रदी**-हत्ती. **कटक**-सैन्य. **क्षितितळीं**-पृथ्वीच्या पृष्ठभागावर. **नामैकशेषा**—नांवानें मात्र शिल्लक. प. ५ **दान**—हत्तीच्या गंडस्थळांतील मद. **व्रज**—लोट. **वर्षा**—वर्षाकाळ. **शिखी**—मयूर. **कर्दम**—चिखल. **कांतांसवें**—भार्यांबरोबर. प. ६ (स्र. वृ.) **भेरी**-रणदुंदुभि. **बधिर**-कानठळ्या बसलेले. **युद्धयज्ञ**-रणयज्ञ. **क्षमेला**-पृथ्वीला. **सुमित्रासुत**-लक्ष्मण. **भटजन**-योद्धयांचा समूह. प. ७ **निमाले**-नष्ट झाले. **विकट कटकभट**-सैन्यांतील भयंकर योद्धे. प. ८ (शिखरिणी वृत्त.) **उसळले**-धावले. **वाय्वग्नि**-वायु आणि अग्नि. **कांड**-बाण. **व्रात**-समूह. **तदिषु०**-त्याच्या बाणापासून निघालेल्या अग्नीनें तापलेला. **तरणी**-सूर्य. प. ९ (रथोद्धता वृत्त.) **सूर्यरश्मिसमुदाय**-सूर्यकिरणांचा समुदाय. **आटला**—नष्ट झाला. **जनविलोचनें**—लोकांचे डोळे. **यशःप्रथा**-कीर्तीचा डंका वाजविणारी. प. १० **तिमिरीं**-अंधारांत. **स्वपरांस**-आपल्यांला व शत्रूंना. **वार**-धाव.

**आकस्मि**०एकाएकीं मिळालेल्या द्रव्यानें माजून आंधळे झालेले. ( ११ )-( द्रुतविलंबित वृत्त. ) **गजकर**-हत्तींची सोंड. **करवाल**-तरवार. **बाल**-कुमार. **क्षतज**-रक्त. **लयकर**-प्राणघातक. **लवकरें**-लवाच्या हातानें. **क्षत**-जखम. ( १२ ) **खड्गपात**-तरवारीचा घाव. **गजदंतीं**-हत्तीच्या दातां-वर. **दिगंतीं**—दिशांच्या टोकांत. **पावक**—अग्नि. **गजवाजी**-हत्ती व घोडे. **प. १३ काळसर्परसना**—कृष्णसर्पाची जीभ. **कातर**—भित्रा. **वारी**—निवारण करील. **नरमारी**—महामारी. **प. १४ सोदर**—सख्खा भाऊ. **काका**-चुलते. **कलितशस्त्र**-हातांत शस्त्रें घेतलेलीं. **कबंधें**-शिरच्छेद झालेलें धड. **निजजनांसचि**—आपल्याच लोकांना. **अंध**—आंधळी; कारण त्यांना डोळे नव्हते. **प. १५** ( व. ति. ) **शोणित**—रक्त. **तटिनी**—नदी. **कातरांतर**-भित्र्या मनाचे. **क्षितिसुततनयायुधांनीं**-जानकीपुत्राच्या शस्त्रास्त्रांनीं. **यमराजधानी**—यमाची नगरी. **प. १६** (व. ति.) **निषेवुनि**—सेवन करून. **भुतें**—पिशाचें. **प. १७** ( शा. वि. ) **आसूर्योदय**—सूर्योदयापासून. **बळ**—सैन्य. **संहारितां**—नाश करतांना. **कोपशिखि**—क्रोधाग्नि. **उदंड**-अतिशय. **दाहिलें**—दग्ध केलें. **संताडी**-प्रहार करी. **कुशहृत्स्थळासि**—कुशाच्या वक्षःस्थळावर. **अनळज्वाळा**—अग्नीच्या ज्वाळा. **असत्कंदनीं**-दुष्टांच्या संहाराविषयीं. **प. १८ निवारण**—दूर करणें. **वारणशत्रुप्रताप**—हत्तीसारख्या शत्रूस फार ताप देणारा. **काम**—इच्छा. **प. १९** ( अनुष्टुभ्० ) **पंचता**—मृत्यु. **पतंगदीपकन्यायें**—दिव्यावर पतंग झडप घालून मरतो त्याप्रमाणें **प. २०** ( शा. वि. ) **शिशो**—मुला ! **खळा**—दुष्टा. **ममाश्वोत्तम** मम+अश्व+उत्तम माझा उत्तम घोडा. **यमालयपथीं**-मृत्युसदनाच्या मार्गाला. **पथिक**-वाटसरू. **प्रसू**-माता. **सश्रमा**-दुःखी कष्टी. **प. २१** ( पृथ्वी० ) **मदीयबळशोणित**-माझ्या सैन्याचें रक्त. **क्षमा**—पृथ्वी. **तर्पिली**—तृप्त केली. **मखहय**—यज्ञाचा घोडा. **प. २२ शरणागत**--शरण आलेला. **समर्थभय**—महत्संकट. **वारे**-निवारण होईल. **प. २३ जननीस**—आईला. **निजजीवनदातृ**—आपल्याला जीवदान देणारा **प. २४** (स्रग्धरा वृत्त) **तुंड**-तोंड. **खदिरांगारकुंडें**-खैराच्या निखाऱ्यांचीं कुंडें. **पादाहत**-पायानें तुडविलेला. **उरग**-साप. **दंतवक्त्र**-दांत व तोंड. **खंडी**-चावूं लागला. **कोदंडी**-धनुष्य हातांत घेतलेला. **चंडकांडी**—फार तीव्र आहेत बाण ज्याचे असा. **पत्र**—वाहन. **शिखंडी**—मोर मोर हें कार्तिकस्वामीचें वाहन आहे. **प. २५** (ल०) **सप्तेषुवृंद**-सात बाणांचा जुंबडा. **खरविशिख**-तीव्र बाण. **तदर्ध**-त्याचें अर्ध,पांचशे. **स्थविर**-म्हातारा, जांबवान्. **महास्त्रें वाहे**-मोठ्या अस्त्रांचा मारा सहन केला. **प. २६** (अनुष्टुभ् वृत्त) **बलाकृष्ट**—जोरानें ओढलेलें **शिलीमुख**—बाण. **भूगत**—धुळींत पडलेली.

प. २७ ( उपेंद्रवज्रा वृत्त. ). **षट्चंडकांडप्रकर**—षट्+चंड+कांड+प्रकर—सहा तीक्ष्ण बाणांचा जुडगा. **ससूत**—सारथ्यासहवर्तमान. **वाजी**—घोडे. प २८ ( इंद्रवज्रावृत्त. ) **युद्धनिरंकुश**—युद्धांत अकुंठित गति ज्याची तो. **संमूढ**—बेशुद्ध. **वमे**—ओकला. प. २९ ( शा वि. ) **भास्वत्कुळाचा टिळा**—सूर्यवंशाचें भूषण; ( भरत. ). **योजनायत**—चार कोस लांब **मरुत्पुत्र**—मारुति. **समुत्पाटिला**--उपटला. **हुंकार**०--नुसता 'हुं' असा शब्द करून ज्यानें त्रिभुवनाचा थरकांप केला आहे, अशा मारुतीनें. **त्रसरेणु**—परमाणु. **संचय**—लोट, गोळा. **वियद्गंगांतरीं**--आकाशगंगेंत. प ३० ( शा. वि. ) **वातोद्भूत**—वाऱ्यानें उधळलेला. **महीध्ररेणु**—पर्वताचा भुगा. **खांगण**—आकाश. **धुत**०—आपले अलंकार झाडले ज्यांनीं अशा. प. ३१ ( शा. वि. ) **सद्यशःसंचक**—उत्तम यश मिळविणारा. **वज्रच्छिन्न**—वज्रानें फोडलेला. **नगेंद्र**—विशाळ पर्वत. **सांद्रविघट्टित**—जिच्यावर जोरानें प्रहार झाला अशी. प. ३२ ( इंद्रवज्रा वृत्त ). **कौतुक**—अद्भुत कृत्य. **भट**—योद्धे. **अवशिष्ट**—बाकी उरलेली. **भ्याड**—भित्रे.

## ४०. कृष्णाची अग्रपूजा. पृ. ८९–९१.

प. १ **कार्यमूळ**—मुख्य काम. **पूजासनीं**—पूजेच्या स्थानावर. **आरूढे**—चढला. प. २ **सोमकांत**—चंद्रासारखी. **चवाई**—चवरंग प ३ **माद्रीपुत्र**—नकुळ. प. ४ **क्षीरोदक**—क्षीरसागराचें जल. **नीलजीमूत**—निळा मेघ. प. ५ **व्यजनु**—पंखे प. ६ **प्रेमादरें**—अगत्यपूर्वक. प. ७ **धुमाळी**—धांदल. प. ८ **लोटले**—वाहूं लागले. प. ९ **त्रिलोकींचीं**—त्रैलोक्यांतील. **ओढविती**—घालिती. प. १० **चरणामृताची**—चरण हेच कोणी एक अमृत त्याची. प. ११ **संध्याराग**—तांबूसवर्ण. **मिनले** एकत्र झाले. **बालार्क**—सकाळचा सूर्य. प. १२ **रातोत्पलें**—तांबडीं कमळें. **सहपरिमळें**—सुगंधयुक्त. प. १३ **चंद्रीं** चद्रानें. **कर्वतीं दिधलें**—कापून घेतले. **शकलें**—तुकडे. **पादांगुळीं**—पायांचीं बोटें. प. १४ **ऊर्ध्व** वरच्या. प. १५ **सुशोभित**—सुंदर. **पद्मा**—लक्ष्मी प. १६ **नौका**—नाव. **हेळा**—लीलेनें. **भव**—संसार. **दुस्तर**—दुर्लंघ्य प. १७ **साधक**—योगसाधन करणारे. **मनसंघाट**—मनोनिग्रह. प. १८ **पादांबुजीं**—पदकमलामध्यें. **मिनलीं**—एकत्र झालीं. प. १९ **प्रवालवर्णी**—पोंवळ्यासारखें लाल. प. २० **रक्तमणी**—माणकें. **श्रेणी**—पंक्ति. प. २१ **कालिंदीचे**—यमुना नदीचे. **जानुद्वय**—दोन्ही गुडघे. प. २२ **मनोमराळ**—मानसहंस. **श्रद्धाळू**—भक्तिमान्. प. २३ **पाविजे**—प्राप्त होतो. **मरणें**—मृत्यु आल्यानें. प. २४ **गुल्फद्वय**—दोन्ही घोंटे **जघन**—कुल्ले. **स्तंभ**—खांब. **पाचूचे**—पाचेचे. प. २५ **मुक्तपालवी**—मोत्यांच्या झालरी.

**वैरणियाचा**–पांघरण्याचा. **कनकवर्णी**–भरजरीचा. **प. २६ चंचलतेची**–हालचालीची. **निश्चल**–स्वस्थ. **प. २७ मेखला**–कमरबंद. **तरणा**–सूर्य. **प. २८ मध्य**–कमर. **पंचानन**–सिंह. श्रीकृष्णाची सिंहकटी पाहून सिंहानें तोंड चुकविलें असा भाव. **प. २९ कौस्तुभसूर्याची नंदिनी**–कौस्तुभरूपी सूर्याची कन्या. ( यमुना ). **त्रिवळी**–वक्षःस्थळावरील रोमपंक्ति. **प. ३० आपादकंठलग्न**–पायांपासून गळ्यापर्यंत पोंचलेली. **विराजे**–शोभते. **प. ३१ श्रुतिसागरीं**–कर्णसमुद्रांत. **तळपती**–चमकत होतीं. **मकराकृति**–मत्स्याकृति. **प. ३२ वदनचंद्राशीं**–मुखचंद्राशीं. **सख्य**–मैत्री.**प. ३३ तरणी**–सूर्य. **अपूर्व**–लोकविलक्षण. **व्यजनें**–पंखे. **प. ३४ अधरबिंब**–बिंबासारखे ओठ. **दशन**–दांत. **शुक**–पोपट. **सर्वानंदवर्धन**–सर्वांच्या आनंदाची वृद्धि करणारा. **प. ३५ बाहुवटे**–बाव्हटे. **कीर्तिवदनें**–कीर्तिमुखें. **करमुद्रिका**–हातांतील मुद्रा. **प. ३६ यमुनाजळावर**–यमुनेच्या पाण्यावर. **जान्हवीजल**–भागीरथीचें पाणी. **प. ३७ जगजेठी**–बलाढ्य.**सुगंधचूर्ण**–बुका. **प. ३८ कुरुनंदनें**–धर्मराजानें. **प. ३९ उभयनेत्रीं**–दोनही डोळ्यांत. **रत्नदीप**–रत्नाचा दिवा. **निष्कंप**–न हालेसा. **प. ४० काया**–देह. **वाचा**–वाणी. **मन**–चित्त. **धन**–द्रव्य. **पुष्पांजली**-फुलांनीं भरलेली ओंजळ. **अर्पिल्या**–वाहिल्या. **प. ४१ दंडप्राय**-साष्टांग. **जयजयकार**–जयघोष.

## ४१. भरताची बंधुप्रीति पृ. ९२—९६.

**प. १** ( व. ति. ) **पायीं**–पायांनीं. **जटामुकुट**–जटेचाच मुकुट. **काम**–गोष्ट. **लाहो**–लाभ. गजर. **प. २** ( रथोद्धतावृत्त. ) **वल्कलजटादिक**–वल्कलें जटा आदिकरून. **सानुज**–धाकट्या बंधूसह. **रामरत**–रामाच्या ठिकाणीं रममाण. **प. ३** ( व. वृ ) **गुहकनाम**-गुहक या नांवाचा. **किरात**–व्याध. **वाटे**–मार्गामध्यें. **परमाप्त**–मोठा जवळचा नातेवाईक, हितचिंतक. **काय म्हणुनी**–किती म्हणून. **प. ४** [ रथोद्धतावृत्त. ] **दर्भनिर्मित** दर्भ घालून केलेली. **भूतळीं**–जमिनीवर. **प. ५ रामवृत्त**–रामाचा समाचार. **सुरनदी**–भागीरथी. **प. ६** ( इंद्रवज्रावृत्त. ) **रमा**–लक्ष्मी. **चरणांबुजातें**–चरणकमलाला **असोसी**–उत्कंठा. **प. ७**( शालिनीवृत्त .) **दुष्टभावें**–वाईट बुद्धीनें. **जळाला**–होरपळला. **जळाला**–उदकाला. **आश्रम**–पर्णकुटी. **श्रम**–दुःख, कष्ट. **प. ८** ( रथोद्धतावृत्त. ) **पादचिह्नित**–पावलें उमटलेली. **वसुधा**–जमीन **तृषित**-तान्हेलेला. **सुधा**-अमृत. **प. ९** ( द्रु. वि ) **तनुवरी**–शरीरावर. **गुढिया**–गुढ्या. **भारती**–सरस्वती. **प. १०** ( व. ति. ) **वाचे**—मुखाला. **रेणु**–रजःकण. **प. ११** [ मालिनी वृत्त. ] **पदरजीं**–चरणधूळींत. **दीर्घकाळ**–पुष्कळ वेळ. **सुकाळ**–समृद्धि. **पदरेणु**–चरणरज.

**विरिंची**-ब्रह्मदेव. **प.** **१२** [ स्वागता-वृत्त. ] **वामअंकगत**-डाव्या मांडीवर बसलेली. **भूमिकुमारी**-सीता. **वल्कलांबर**-वल्कलें नेसलेला. **प.** **१३** [ व. ति.] **दूर्वादलश्यामलदीप्ति** दूर्वांच्या पानासारखी श्यामवर्ण कांति. **गंगा-तटीं**-गंगेच्या तटाकीं. **प.** **१४** [ इंद्रवज्रावृत्त ] **रघुनंदन**-राम. **पदवंदन**-चरणाला नमस्कार. **अलभ्य** दुर्मिळ. **सुरादिकांही** देवादिकांनीं. **प.** १५ [ भु. प्र. ] **पादपद्म**-पदकमल **सद्म**-घर. **पद्मा**-लक्ष्मी. **क्षेम**-आलिंगन. **विश्वाभिराम**-जगांत सर्वांत सुंदर. **प.** १६ [ स्वागता वृत्त. ] **अश्रुनीर**-अश्रुबिंदु. **वासरा !**-वत्सा. **प** १७ [व. ति.] **वंदी**-नमस्कार. केला. **ब्रह्मण्य**-ब्राह्मणाविषयीं पूज्यबुद्धि बाळगणारा. **माउल्या**-माता. **प.** १८ [ उपेंद्रवज्रा वृत्त ] **सुखी** खुशाल. **सूपराम** मरण. **लोकरीती**—लोकाचाराप्रमाणें. **महा**—पुष्कळ. **प.** १९ [भु. प्र] **सपिंडिक्रिया**-मृताच्या बाराव्या दिवसाचें कर्म. **गंगेतटाकीं**-भागीरथीच्या तीरावर. **लोकदृष्टीस**-जनाच्या दृष्टीनें. **प.** २० ( रथोद्धता वृत्त ) **मनाची**-अंतःकरणांतील. **मांडिली**-काढली. **प.** २१ [ द्रु. वि. ] **झणि**-त्वरित **स्वपुरीप्रती**-आपल्या नगराला. **आधि**-काळजी. **अमरां**—देवांना **महा**-मोठी. **भरतशब्द**-भरताचें भाषण. **नये मना**—मनाला आलें नाहीं. **सुरकामना**-देवांचे मनोरथ. **प.** २२ [ इंद्रवज्रावृत्त ] **मोडवेना**-उल्लंघन करवत नाहीं. **तोडवेना**-अमान्य करवत नाहीं. **संकटांत**—अडचणींत. **हटांत**—हट्टामध्यें **प.** २३ [ भु. वृ. ] **रामवाणी**—रामाचें भाषण. **दीनवाणी**-म्लान. **मृगांकानना**-हे चंद्रवदना ! **कानना**-अरण्यांत. **प.** २४ [ शालिनी वृत्त. ] **बापा** बाबा ! **वर्ततां**-केलें तर. **विशेषें**-फारच. **दोघां**-तुम्हां आम्हां दोघांनाही. **अशेषें**-निखालस. **एवं**-याकरितां. **भजावे**-स्वीकार करावा. **ताताज्ञेनें**—वडिलांच्या आज्ञेप्रमाणें. **प.** २५ [वसंत-तिलका वृत्त ] **येना**-येत नाहीं. **दर्भ रचुनि**-दर्भांचा ढीग करून. **बसे मराया**-अग्निकाष्ठें भक्षण करण्यास सिद्ध झाला. **वक्त्रसरोरुह**—मुखकमल. **प.** २६ [ वसंततिलकावृत्त ] **गुह्य**-गुप्त असलेलें. **अवतारचरित्र**-अवतारलीला. **जग-त्त्रयाला**—त्रिभुवनाला **समजावुनियां**-समजूत करून. **प.** २७ [ इंद्रवज्रा-वृत्त. ] **दशाननासी**—रावणाला. **प्रभु**—रामचंद्र. **काननासी**—अरण्यांत. **निवारूं**-प्रतिबंध करूं. **पददातयाला**-पद देणाराला. **प.** २८ [ वसंततिलका वृत्त ] **मागुती**-माघारा. **चतुर्दश**-चवदा. **वत्सर**-वर्ष. **कल्पना**-मनोरथ. **प.२९** [व.ति.वृ.] **गमननिग्रह**-जाण्याचा निश्चय. **वाचा**-भाषण. **देह**-शरीर. **निरोप**-आज्ञा. **प.** **३०** [व.ति.] **द्विसप्त**-चवदा. **समाप्त**-संपूर्ण. **तयाच वारीं**-त्याचदिवशीं. **विरिंचि**-ब्रह्मदेव. **निवारी**-आड आला. **प.** ३१ [ व.ति. ] **नृपासनातें**-राजसिंहासनावर. **पदपादुका**-पायांतल्या पादुका. **पदांबुजलाभ-कामी**-पदकमलाच्या लाभाची इच्छा करणारा. **प.** ३२ [ प्रियंवदावृत्त. -**जडित**-रत्नखचित. **निजशिरीं**-आपल्या मस्तकाला.

## ४२. सीता शिवधनुष्याचा घोडा करते. पृ. ९६–९८.

प. १ **निजमेढा**–आपलें धनुष्य. **सीता**–नांगर. प. २ **राजांगणीं**–राजवाड्यांतील चौकांत. **राजाबिदीं**–राजरस्त्यावरून. प. ३ **ठायीं**–ठिकाणीं. **रायावरी**–जनकराजावर. प. ४ **बळिया**–मस्तवाल. **क्षत्री**–क्षत्रिय. प. ६ **कंपायमान**–कांपरे भरलेला. प. ७ **लाग**–माग. **गवसूं**–शोधूं. **रेघ**–उठलेली रेषा. प. ८ **पुढा**–पुढें. **दवडा**–धाव. प. ९ **कारी**–पोरी! **अन्याय**–अपराध. **भारी**–मोठा. **क्षितिवरी**–जमिनीवर प. १० **हारिखें**–हर्षानें. प. ११ **पुढां**–पुढें. **गाढा**–अत्यंत. प. १२ **आदिशक्ति**–मूळमाया. **नुचले**–उचलणार नाहीं. **महापुरुष**–परपुरुष, श्रीविष्णु. **प्राप्ति**–लाभ. प. १३ **पुसे**–विचारला. **नेमिला**–निश्चित केला. **निर्धार**–निश्चय. **स्वयंवर**–स्वतः पति निवडण्याचा विधि. प. १४ **वाहील**–लावील. **गुण**–दोरी. **भार्गवाची**–परशुरामाची. प. १५ **जनकापाशीं**–जनकराजाजवळ. **त्रिपुरासी**–त्रिपुरनामक राक्षसास. **छेदिलें**–ठार केलें. प. १६. **शिवें**–शंकरानें. **धनुष्येंसी**–धनुष्यानें. **विध्वंसिलें**–नष्ट केलें. **दक्षयाग**–दक्षप्रजापतीनें केलेला यज्ञ. **सुरवर ऋषी**–मोठमोठाले देव व ऋषि. प. १७ **करीं**–हातांत. **निःक्षत्री**–निःक्षत्रिय. **धरित्री**–पृथ्वी. **चाप**–धनुष्य.

## ४३. सुदामनगरी. पृ. ९८–१०१.

प. १ ( शा. वि. ) **येतां**–परत येत असतांना. **द्वारवतीपुरीहुनी**–द्वारकेहून. **स्वांतीं**–आपल्या मनांत. **तेजःपुंज**–दिव्य. प. २ ( द्रु. वि. ). **हरिचें**–श्रीकृष्णाचें. **लेखिलें**–वाटलें. **वळखिलें**–ओळखलें. **कामिनी**–पत्नी. प. ३ [ पृथ्वीवृत्त ] **कूजत्पक्षिकुळाकुळें**–पक्ष्यांचे कळपच्या कळप गायन करीत आहेत अशीं. **साब्जें**–कमलें असलेलीं. **क्रीडत**–क्रीडा करीत असलेलीं. **संजीवनें**–हुशारी आणणारीं. **भास्वत्**–सूर्य. **सुरनिभ**–देवासारखीं; दिव्य कांतीचीं. प. ४ ( शा. वि ) **पर्णकुटी**–झोपडी. **देवौकसे**–स्वर्गाप्रमाणें. **प्रत्युद्गमनार्थ**–सामोरे. **नागरिक**–गांवचे लोक. **सस्मित**–प्रसन्न वदनानें. प. ५ [ शा. वि. ] **देविप्रभा**–देवांगनेसारख्या. **व्योम**–आकाश. **नानावाद्यरवें**–अनेक प्रकारच्या वाद्यांच्या घोषानें. प. ६ [ शा. वि. ] **मागध०** स्तुतिपाठक, भाट, वैतालिक आणि भालदार ह्यांचे समुदाय. **उपायनपाणि**–नजराणे आहेत हातांत ज्यांच्या असे ( नागरिकजन ). **सन्मानिले**–पूजिले. **स+अक्षत+लाज+पुष्प+निकर**–तांदूळ व लाह्या ह्यांनीं युक्त अशी फुलांची रास. प. ७ [ स्रग्धरा वृत्त ] **अत्युत्सवानें**—अत्यंत उल्हासानें. **नारीनरजन**–स्त्रीपुरुषमंडळी. **प्रासादद्वारदेशीं**—राजवाड्याच्या महाद्वाराजवळ. **संभ्रांत**–चकित झालेला. **ग्रस्त** ग्रासलेला. प. ८ [ शा. वि. ] **पद्मांतुनी**–कमलांतून. **पद्मजा**–लक्ष्मी. **दिव्य०**–

देवांच्या अप्सरांप्रमाणें लावण्यानें चमकणाऱ्या अशा हजारों दासींनीं स्तविलेली. **नीराजनपात्र**–आरती. **आलीयुता**–सख्यांसहवर्तमान. **प. ९** [ शा. वि. ] **रत्नदीपनिकर**–रत्नांच्या दिव्यांचा समुदाय. **रोमांचितें**—कांटा आलेल्या. **गेहीं**–घरांत. **बाष्पपूर्ण**–आनंदाश्रूंनीं भरलेल्या. **तावत्काल** तोंपर्यंत. **प. १०** [ दंडकवृत्त. ] **भित्ति**–भिंती. **कांचनी**–सोन्याची. **पुत्तिका**-पुतळी, बाहुली **भ्राजती**–शोभतात, चकाकतात. **शतमित** शेकडों. **शुभ**–दिव्य. **चंचाद्वितानें**=थोडथोडीं हालणारीं छतें **सर्वतः**–चहूंकडे. **११ व्यजनसहित**–पंख्यांसुद्धां. **चामरें**–चवऱ्या. **स्वर्णदंडें**–सुवर्णाच्या मुठी असलेलीं. **दान्त**–हस्तिदंती. **पर्यंक**–पलंग. **पयोराशि**–समुद्र. **फेन**–फेस. **प.१२** [ सवाईवृत्त. ] **अंतरिं**–मनामध्यें. **कौतुक**–आश्चर्य. **दरिद्र-तम**–अत्यंत दरिद्री. **संशयजाळ** संशयसमूह; **स्वजनामर०**–आपल्या भक्तांना जो प्रत्यक्ष कल्पवृक्ष आहे अशा लक्ष्मीपति कृष्णाचें दर्शन प्राप्त होण्याचा जो सुयोग आला त्याचें फळ. **कळालें**-ध्यानांत आलें.

## ४४. वैराग्य–वचनें. पृ. १०१–१०४.

**प. १** ( भु. प्र. ) **अभिज्ञ**–विद्वान् लोक. **ग्रासिलें**–व्यापलें. **दुर्मद**—गर्व. **अज्ञान**–मूर्खपणा. **निजांगीं**–जागच्या जागीं. **प. २** ( शा वि. ) **भ्रमें**–भ्रांतीनें. **मही**–जमीन. **सेविलें**–सेवा केली. **धातु**–पारा, गंधक इत्यादि. **स्मशान**—मसणवाटा. **पाथोधि**—समुद्र. **कपर्दिका**–कवडी. **दुराशे !** –हे दुष्ट आशे ! **प. ३** ( व. वृ. ) ) **खलजनोक्ति**–दुष्ट लोकांचीं भाषणें. **वरिचेवरि**–वरवर. **स्वजठरार्थ**–आपल्या पोटासाठीं. **मदान्ध**–गर्वानें मदोन्मत्त झालेले. **प. ४** (शिखरिणी वृत्त.) **जलजपत्रोदक**–कमळाच्या पानावरचें पाणी. **द्रव्याढ्य**–श्रीमत. **प्रचुर**–फार. **धनलोभास्तव** द्रव्याच्या आशेनें. **वृथा**–व्यर्थ. **विलज्ज**–निर्लज्ज. **मृषा**–खोटी. **आत्मस्तुति**–आत्मश्लाघा **प. ५** ( माणवक वृत्त. ) **रदनावलि**–दंतपंक्ति. **शुभ्रपणें**–सफेतपणानें. **अणु**-रेसभर. **आस**–आशा. **गाजतसे**–दुमदुमत आहे **प. ६** ( शा वि. ) **पानीय** –जळ **वीचि**–लाटा. **अनुराग**–लोभ. **कूलंकषा**–तटावर आदळणारी. **प. ७** ( शा. वि. ) **चारुशिला**–उत्तम पाषाण. **विद्याधर**–ही यक्षगंधर्वांसारखीच एक देवयोनि आहे. **हिमाद्रि**–हिमालयपर्वत. **प. ८** ( व. ति. ) **कंद**–कांदे. **अवघे**–सारे. **शुष्क**–आटून गेलेले. **वाण**–तोटा. **विपिनीं**–अरण्यांत. **तरुवल्कलें**–झाडांच्या साली. **खळांची**–नीचलोकांची. **प. ९** ( शा. वि. ) **वासर**–दिवस. **धनपति**–श्रीमान्. **या दिवसांची**—धनपतीपुढें आर्जव करीत होतों त्या दिवसांची. **अवसान**–शेवट. **शशिमुखी**—चंद्रानना. **तप्तहेमप्रभा**–तापलेल्या सोन्याप्रमाणें कांति आहे ज्यांची अशा. **स्मरणास**

**योग्य रचिलें**--नामशेष केलें. **प. १०** (शा०वि०) **नृप**--राजा. **प्रधान**-मंत्री. **वंदिजे**—नमस्कार असो. **प. ११** (शिखरिणी० ) **पलपलपणें**—पळापळानें. **व्यासंगानें**-उद्योगामध्यें गर्क झाल्यानें. **विविध**—नानाप्रकारचीं. **नुपजे**—
—न+उपजे-उत्पन्न होत नाहीं. **त्रास**—कंटाळा. **मोहमदिरा** मोहरूप मद्य. **प. १२** ( शा०वि० ) **आयु** —आयुष्य. **चर्वितचर्वणोपम**—चावलेलें पुन्हां चावण्यासारखें. **विकृतिप्रसंग**—वीट, कंटाळा. **प. १३** ( शा० वि० ) **श्रुति**—वेद. **भाग्यें**—वैभवानें. **विश्रुत**—प्रसिद्ध. **अंतर**—भेद. **भाग्यवंतगणना**—श्रीमंताची पर्वा. **प. १४** ( तोटक वृत्त ). **रजनीस**-रात्रीचा. **नांदतसे**—वावरतो. **स्थिर**—शाश्वत. **कुमती**—दुर्बुद्धि. **प. १५** ( शिखरिणी वृत्त. ) **जधीं**—जेव्हां. **तधीं**—त्या वेळीं. **द्विपसम**—हत्तीसारखा. **मदें**—गर्वानें. **गर्वज्वर**—गर्वरूप ताप. **उतरला**—नष्ट झाला. **प. १६** ( शा० वि० ) **भाग्य**—वैभव. **भृत्यादिकीं**-चाकरनोकरांनीं. **पराङ्मुख**—पाठ फिरविलेले. **जन्हुकन्यातटीं**-भागीरथीच्या तीरीं. **निकुंज**—लतागृह. **प. १७** ( शिखरिणी वृत्त ) **हिमाचल**-हिमालय. **शिला**—पाषाण. **सुरनदीतटीं**-भागीरथीच्या तीरावर. **जनसगती**—जनसंपर्क. **ढवाचिती**—धक्के देतील. **हरिणपोत**-पाडस. **श्रृंगांकुरें**-शिंगांच्या टोंकांनीं. **प. १८** (शा. वि.) **शर्व**—शंकर. **भूधर**—पर्वत. **ग्रावाग्र**—पर्वताचे शिखर. **स्वर्णदी**-भागीरथी. **अर्णव**-समुद्र. **अधःपतन**-अधोगति,दुर्गति.**प. १९**(शा. वि.) **परितोष**-संतोष, संतोषवृत्ति. **नैराश्य**-वैराग्य. **बाणतां**-ठसलें असतां. **भाग्य**-दैव. **निर्भाग्य**-भाग्यहीन. **प. २०** (शा. वि.) **पाणियुग**-दोन्ही हात. **भक्षिती** सेवन करतात. **मल**—पातक. **क्षिती**—जमीन. **दैन्य**—दरिद्रता. **विरक्ति**-वैराग्य. **वनिता**—स्त्री. **कर्मकलाप**-कर्मसमुच्चय. **प २१**(शा.वि.) **मेदिनि !**-वसुंधरे. **मारुता**-वायो. **स्वजनका**-माझ्या पित्या !-**भवत्कृपेस्तव**—तुमच्या कृपेनें **वर्षोपल**—गारा. **प. २२** ( शा. वि. ) **स्वस्थ**—निकोप. **जरा**—वृद्धापकाळ. **शक्तें**—सशक्त. **आत्मप्राप्तिसुखार्थ**-आत्मस्वरूपाच्या लाभाच्या सुखाकरितां. **मंदिर**—घर. **दीप्त**—पेटलेलें. **कूपखननीं**-विहीर खणण्यांत.

## ४५. पूर्वग्रंथकारांस प्रणामांजलि. पृ. १०४-१०५.

**प. १ आचार्य शंकर**-शंकराचार्य. **उच्छेदोनि**-खंडून टाकून. **शुद्ध**—खरा. **वाढविला**—स्थापन केला. **प. २ मतवादि**-भिन्नभिन्न मतस्थापक. **दरिद्री**-निःसत्त्व. **संन्यासदीक्षा**-संन्यासधर्म. **विधियुक्त**-सप्रमाण. **प. ३ रजनीचर**-राक्षस. **यादवेंद्र**-श्रीकृष्ण. **प. ४ कुमतें**-पाखांडी मतें. **श्रीधरभ्रमरें**—श्रीधर-कविरूप भृंगानें. **प. ५ मधुसूदन**-ह्याची ‘ मधुसूदनी टीका ’

प्रसिद्ध आहे. **प. ६ शृंगारवनींचा**—शृंगाररूप उद्यानांतील. **विहंगम**-पक्षी. **पद्मावतीरमण**—पद्मावतीचा पति. **तटस्थ**—थक्क. **प. ७ वेदांतक्षीरार्णव**—वेदांतरूपी क्षीरसागर. **मीन**—मत्स्य. **प. ८ रामावतार**—रामाचा अवतार. **साचार**—खराखरा. **प. ९ कुलभूषण**—वंशाचा अलंकार **प्रतिष्ठानवासी**—पैठणांत राहणारा. **प. १० उचंबळे**—उसळतो. **प. ११ चंडांशु**—सूर्य. **व्योमीं**—आकाशांत. **वामनस्वामी**—वामनपंडित. **अपूर्व**—अप्रतिम. **प. १२ श्रीरामउपासक**—रामभक्त **निर्मळ**—सदाचारसंपन्न. **भक्तसरोवरीं**—भक्तरूप सरोवरांतील **मराळ**—राजहंस. **प्रबळ**—समर्थ **ज्ञानभरित**—ज्ञानानें परिपूर्ण. **निःसीम**—निखालस. **प १४ बंधु**—भाऊ. **उद्धरिले**—मुक्त केलें. **प. १५ कविवर**—कविश्रेष्ठ. **अवघे**-सारेच. **साचार**—खरोखर. **वर**—प्रसाद, आशीर्वाद.

## ४६. दुर्योधनाचा मानीपणा. पृ. १०५–१११.

**प. १ भग्नोरु**—मांडी मोडलेला. अहित—शत्रु. **मानी**—अभिमानी. **मत्पुत्र**—माझा मुलगा. **प. २ पादतळ**—पायाचा तळवा. **याद**—जलचर प्राणी. **प. ३ अयुतद्विपबळ**—दहा हजार हत्तींची शक्ति. **समर्थ**—बलाढ्य. **लोकेश**—राजा. **पर०**—शेंकडों शत्रूंना आवरण्याला समर्थ. **नियमी**—बांधी. **प. ४ श्वास**—सुस्कारा. **साधुचाही**—भल्याचा सुद्धां. **विश्वास**—भरंवसा. **प. ५ मद्रप** शल्य. **अश्वत्थामा** द्रोणाचार्यांचा पुत्र. **वीरवर**—वीरश्रेष्ठ. **प. ६ नाथ**—पराक्रमी. **अवस्था**—दशा. **दुरतिक्रम**—अनुल्लंघनीय. **वृद्धोक्ति**—वडिलांचें सांगणें. **प. ७ आजी**—आज. **तृणाचि**—कस्पटासारखाच. **शक्रशतासींहि**—शंभर इंद्रांबरोबरसुद्धां. **आजी**—युद्ध. **प. ८ लंघुनि समय**—युद्धनियम उल्लंघून. **मदूरुयुग**—माझ्या दोन्ही मांड्या. **मथन**—मोडणें. **कथन**—सांगणें. **प. ८ कपटें**—कपटानें. **पांडुतनयांहीं**—पांडवांनीं. **शूरजन**—शूर पुरुष. **प. १० मदूरू**—माझ्या मांड्या. **भर्दिलें**—तुडविलें. **अधार्मिकमदानें**—अधर्मी लोकांस शोभणाऱ्या गर्वानें, मदोन्मत्तपणानें **प. ११ अकंटक**—निष्कंटक. **नाकीं**—स्वर्गांत **प. १२ शत्रुशिरीं**—शत्रूच्या मस्तकांवर. **देय**—देण्यास योग्य. **अर्थ**—सार्थक. **प. १३ पराजित**—पराभव पावलेला. **परप्रेष्य** शत्रूचा चाकर. **अरिपद०**—शत्रूंनीं राज्यपद हरण केल्याचें जिणें. **आमरण** – मरेपर्यंत. **निर्विघ्न**—कोणताही अडथळा न येतां. **दावा**—द्वेष. **सत्पुरुषपुंगव**—सत्पुरुषांमध्यें श्रेष्ठ. **लादावा**—संपन्न असावा. **प. १५ मनुपूत**-मंत्रांनीं पवित्र झालेलें. **मखशिखिकुंडीं** यज्ञकुंडाच्या ज्वाळेमध्यें. **प. १६ सुप्त**-निजलेला मनुष्य. **प्रमत्त**—माजलेला. **अनयानें**—अन्यायानें. **प. १७ छळवधें**—कपटानें केलेल्या वधानें. **दुर्यश**—दुष्कीर्ति. **सुयश**—सत्कीर्ति. **प. १८ छळबळें**—कपटाच्या जोरावर. **सावधान**—सावध. **प. १९ सुहृज्जन**—आप्तइष्ट. **प्रांत**—शेवट. **विरस**—कंटाळवाणा. **प. २०**

**विलापानें**-शोकानें प. २१ **स्वसा**-बहीण. **परस्व**-दुसऱ्याचें धन. **साम**-सख्य. प. २२ **पृथुलोचना**—विशालनेत्री. **प्रसू**-माता. **नाहीं होईल**—नाहींशी होईल, प्राणत्याग करील. **प्रसूनांहीं**—पुष्पांनीं. प. २३ **वाग्विशारद्**—अत्युतम वक्ता. **चार्वाक**-हा प्राचीन कालच्या नास्तिकांत प्रमुख होता. **अपाचिति**-पापविमोचन. प. २४ **विलाप**-शोक. **हाय**-हाय ! हाय. प. २५ **सचराचर**—स्थावरजंगमात्मक. **नरवरा**—पुरुषश्रेष्ठा ! **ख**-आकाश. **धरा**-पृथ्वी. प २६ **युद्धव्यवहार**—युद्धाची कला. **ऊरुद्वय**-दोन्ही मांड्या. प. २७ **शोणित**-रक्त. प. २८ **सूतांहीं**-सारथ्यांनीं. **महाजवन**-मोठे वेगवान्. **वाजी**-घोडे. **क्षतार्त**-जखमांनीं पीडिलेलें. **जव**-वेग. प. २९ **कुरुराज**-दुर्योधन. **प्रमथितोरु**—मांडी मोडलेला. **पतित**—पडलेला. **हरिहत**-सिंहानें घायाळ केलेला. **समस्त०**—सर्व ग्रहांचा राजा. **तरणी** सूर्य. प. ३० **क्रव्याद्**-मांसभक्षक राक्षस वगैरे. **परिवृत**-वेढलेला. **उग्रकृत्यांहीं**—भयंकर आहे कृत्य ज्यांचें अशांनीं. **सत्तम**-श्रेष्ठ प. ३१ **कष्टा**-यातना देणारी. **प्रभुहानि**-राजाचा मृत्यु. **कुळज**—कुळवंत. **सहावेना**-सोसवत नाही. प. ३२ **पातदाहीं**—पतीच्या दहनसमयीं. **रति**-मदनाची स्त्री. प. ३३ **धीराला**—त्या धैर्यशाली पुरुषाला. **हुंदका**—कढ. **अग्निकुंडकारा**-अग्निकुंडांतील ज्वाला. प ३४ **द्रौणि**-अश्वत्थामा (८५) **राजा**-हे दुर्योधना ! **दशा**—स्थिति. **धूलि**-धूळ. प. ३६ **क्रव्याद्**-राक्षस. **शक्राचीसी**-इंद्राच्या आज्ञेसारखी. **सदाज्ञा**-सत्+आज्ञा-करडा हुकूम. प. ३८ **सोदर**-सख्खा बंधु. **सखा**—मित्र. **झषां**-मत्स्यानां. **अर्ण**-पाणी, ओढा. प. ३९ **चवरे**-चवऱ्या. **गमति**-वाटतें. **विधिच्या**-ब्रह्मदेवाच्या. प. ३९ **चपला**-चंचळ. **श्री**-लक्ष्मी. **प्रत्यय**—अनुभव. प. ४० **मर्त्याचा**-मनुष्याचा. **विपदोक**-विपत्तीचें घर. **होयाचा**—व्हावयाचा. प. ४१ **टेक**-बाजू. **वीराभिनय**-शूराचे हावभाव. **नट**-सोंगाड्या. प. ४२ **शात्रव**-शत्रूच्या. **स्यमंतपंचक**-या नांवाचें रणक्षेत्र. **रोगार्त**. रोगग्रस्त. **मंचकीं**-पलंगावर. प. ४३ **अनंतसुकृतें**-अगणित पुण्यानें **कायहानि**-देहनाश. **रुचिरगृहीं**-शोभिवंत घरांत. **निबरा**-चांगला. प ४४ **अधर्में**-अधर्मानें. **धार्मिक**-धर्मात्मा. **आलें**—ओली सुंठ. प. ४५ **निहत**-**ज्ञातिबांधव**-स्वजातिबांधव ज्याचे मेले आहेत असा. **उरतों**-जगलों असतों. प. ४६ **प्रभाव**-प्रताप, सामर्थ्य. **दुज्याचा**-दुसऱ्याचा. **यदु**-यादववंशांचा पूर्वज-प. ४७ **प्रलयांत**-अनर्थांतून. **मेरुतुल्य**-मेरुसारखें. प ४८ **दुरतिक्रम**—अनुल्लंघनीय. **मुनिदृष्टि**-तपोनिष्ठ ऋषींची दृष्टि. **बळाकेला**-बगळीला. (तपोनिष्ठ मुनीच्या क्रोधदृष्टीनें बगळी भस्म होऊन पडल्याची कथा 'व्याधगीते-' मध्यें प्रसिद्ध आहे.) प. ४९ **दशा**-अवस्था. **माझी**-माझी. प. ५० **नृपाल**-राजा (दुर्योधन). **रजांत**-धुळींत. **मृदुल**-मऊ. **पयःफेन**—

दुधाचा फेस. प. ५१ **वदन**—तोंड. **पांचालांचें**–पांचाल देशाच्या वीरांचें. **कदन**–नाश. प. ५२ **त्रैलोक्यमान्य**–त्रिभुवनास वंद्य. **अधमांनीं** दुष्टांनीं. **ऋजुयोधी** धर्मयुद्ध करणारा. **लब्धवध**-मृत. प. ५३ **वधितें**-वध केला असता. **बाणतां** झोंबला असता. **विषदिग्ध**-विषारी. प. ५४ **स्वताातघातें**-माझ्या वडिलाच्या मृत्यूनें. **शिशुसख्य**–बालपणापासूनची मैत्री. **क्षितिवरील**-जगांतील. प. ५५ **परांतें** शत्रूंना. **प्रेषीन**—पाठवीन. **प्रेतराजभवना**–यमसदनाला. **अरिलयबल**–शत्रुनाशाचें सामर्थ्य. **मच्छस्त्रां**–माझ्या शस्त्रामध्यें. **अघलयसामर्थ्य**–पातकनाशाचें सामर्थ्य. **भवनामी**–शंकराच्या नामांत. प. ५६ **ऋण**—देणें. **वारीन**–देऊन टाकीन **तातघातकातें**–माझ्या पित्याचा वध करणारास. प. ५७ **पण**–प्रतिज्ञा. **मानिवर्य**–परम अभिमानी ( दुर्योधन.) **अर्यसु**–अरि–असु–शत्रूचे प्राण. **खपात्रे**–नाश पावावेत. प. ५८ **तूर्ण**–लौकर. **कलश**–भांडें. **जलपूर्ण**-पाणी भरलेला. प. ५९ **प्राज्ञा**–ज्ञात्याला. **द्रौणिशिरीं**–अश्वत्थाम्याच्या मस्तकावर. प. ६० **मत्प्रिय**–माझें बरें. **आर्या**–श्रेष्ठा. प. ६१ **राजनियोगें**–राजाच्या आज्ञेनें. **विप्रें**–ब्राह्मणानें. **वेदज्ञ**--वेदवेत्ते. **समग्र**--सारें प. ६२ **भाचा**--कृपाचार्यांचा भाचा(अश्वत्थामा.)**कंजनाभ**-विष्णु. प. ६३ **शिखी**--अग्नि. **इद्ध**--पेटलेला. प. ६४ **मीनसा**--माशासारखा. **कुरुराज**--कुरुश्रेष्ठ, दुर्योधन.

## ४७. सज्जनप्रशंसा. पृ० १११.

प. १ **अधिष्ठान** मूळ. **गुह्य**–गूढ. **प्रगटे**–प्रगट होतें. प. २ **आक्षेप**–शंका. **आटले**--निरसन झाले. **तर्कितां** कल्पना करतांना. **निजवस्तु**--आत्मस्वरूप. प. ३ **वेगडी**--वेड. **तातडी**--चंचलता. प. ४ **स्वानुभवें**--आपल्या अनुभवानें. **माहिमा**–माहात्म्य. प. ५ प. ६ **निजतृप्ति**--खरी तृप्ति. प. ७ **क्षेत्र**--स्थान. **सत्पात्र**—अत्यंत योग्य. प. ८ **भांडार**—ठेवा. **सायुज्य**--स्वस्वरूप. प. ९ **मोक्षश्रिया**—मोक्षलक्ष्मीनें. **अलंकृत**—भूषित. **जीव**—प्राणी. प. १० **चक्रवर्ती**—सार्वभौम. प. ११ **माहिमा**—थोरपणा. **उणी**--कमी. **उपमा**—तुलना.

## ४८. संकीर्ण अभंग. पृ० ११२–११३.

प. १ **अंतकालींचें**–अखेरीचें. प. २ **सांगाती** सोबती. **मोकलोनी**–सोडून देऊन. **अंतकालीं**–मरणसमयीं. प. ३ **पारिखें होतें**. सोडून जातें, अंतरतें. **परावीं**-दुसरीं मनुष्यें. प. ३ **कारलीया**–कारल्याला. **आळें**--खत. प. ४ **वज्र**–हिरा. **भंगे**--फुटेल. **खल**--दुष्ट प. १ **सूकराची**–डुकराची. **विष्ठा** —नरक. **माने**--आवडते. **सावकाश**- खुशाल. **मिष्टान्न**-पक्कान्न. प. २ **पाखांड**--नास्तिकपणा. **नलगे**--लागत नाहीं. प. ३ **पंचामृत**

- पंचपक्वान्न. **हाडावरी**—हाडकावर. **प. ४ क्षीर**—दूध. **वमितां**—ओकले तर. **विखार**--सर्प. **विष**--मारक पदार्थ. **प १ मणि**—रत्न. **मकरतोंडीं**--मगराच्या तोंडांत. **प. २ परि**--परंतु **बोधवेना**—वळवितां येत नाहीं **दुधें**--दुधानें. **कूर्मीच्या**–कासवीच्या. **पाळवेल**–पोसतां येईल. **सेना**–सैन्य. **प ३ कदाचितें**—कदाचित्. **शशशृंग**-शशाचें शिंग. **प. ४ प्रेत्नें**—प्रयत्नानें. **वाळुवेतें**–वाळूला, रेतीला. **दिव्य**–उत्तम. **प. ५ खवळला**–बेफाम झालेला. **फणी**–सर्प. **पुष्पप्रायी**–फुलासारखा.

## ४८. भक्ताचा टाहो. पृ. ११३–११८.

**प. १ सदा०**—सज्जनांनीं आश्रित आहे पद ज्याचें अशा. **विनोदास्पद**–करमणुकीचा विषय. **कलिमल**–कलिसंबंधीं मल म्ह० पाप. **कामद**–इष्ट मनोरथ पुरे करणारा. **वदान्य**–दाते. **सद्गुरु**–श्रेष्ठ. **असन्मद**–दुष्टांचा गर्व. **अरि**–चक्र. **दर**-शंख. **नंदक**–विष्णूच्या हातांतील तलवार **अंबुज** कमल. **धर**–धारण करणारा. **नमस्ते**–तुला नमस्कार असो. यापुढच्या सर्व श्लोकांचे वृत्त पृथ्वी. **प. २ व्रजावन**–गोकुळाचें रक्षण. **नखाग्रीं**–नखाच्या टोंकावर. **धरा**–पृथ्वी. गोवर्धन पर्वत कृष्णानें करांगुलीवर धरून पर्जन्यापासून गोकुळाचें रक्षण केलें या कथेकडे कवीचें लक्ष्य आहे. **सलील**—लीलेनें. **मंदर**—पर्वत. विशेष. **वराहतनु**—वराहाचा अवतार. **रदाग्रें**—दातांच्या टोंकानें. वराहावतारीं विष्णूनें दंताग्रानें पृथ्वी उचलून धरिली, या पौराणिक कथेकडे येथें लक्ष्य आहे. **प. ३ नतावनधृतव्रत**—शरणागताचें रक्षण करण्याचें स्वीकारलें आहे व्रत ज्यानें असा. **ज्वलन**–अग्नि. **बाधावन**—बाधारूप अरण्य. **प्रजव**—महावेगवान्. **धावन** धावून जाणें. **प्रकट**—प्रसिद्धपणें. **वारण**–हत्ती, गजेंद्र. **सती**—द्रौपदी. **व्यसन**—संकट. **वारण**—दूर करणें. **जयजयार्थ**–अर्जुनाला जय मिळावा म्हणून **रण**—भारतीय युद्ध. **प. ४ भवच्चरण०**—आपल्या पायांपासून निघालेली ( भागीरथी ). **आपगा** - नदी. **श्रवण**—कान. **कार्यलोभी**—मोक्षरूप कार्य करून घेण्याची इच्छा करणारा. **प. ५ पटुत्व**—निपुणपणा. **जनि**—जन्म. **हावरा**—अधाशी. **प. ६ दयाब्द**–दयेच्या मेघा ! **वळशील**—डोक्यावर येऊन कोसळशील, प्रसन्न होशील. ' सेवकां चातकां किमपि उणें न ' इत्यादि अन्वय. **उबगणें**—उपेक्षा करणें. 'तूं देव उबगशील कां,' असा अन्वय. **अनन्यगतिक**–दुसरी नाही गति ज्यांना असे. **सोपद्रव**–त्रस्त, दुःखित. **अर्णव**–समुद्र. **उमोप**-पुष्कळ. **द्रव**-पाझर, दया. **प. ७ कळी**–कली. यानें नलाच्या शरीरांत प्रवेश करून त्याला द्यूतप्रवृत्त केलें व वनवास भोगावयाला लाविलें अशी कथा आहे. **सुनिर्मळ**—फार पवित्र, शुद्ध. **दावा**—वैर. **नल**—नलराजा. **तयांत**—तशांत. **अविशुद्ध**— पापी.

**शलभ**–टोळ. **दावानल**–वणवा. **व्रणार्त**–व्रणानें पीडलेला. **काकसे**–कावळ्यासारखे. **स्मरादि**—काम, क्रोध, लोभ इत्यादि. **भेक**—बेडूक. अहि भेका काळ ( भक्षक ) कसे न ? ' इत्यादि अन्वय. **प. ८ जिनें**—ज्या शबरीनें. **प्रशिथिल**—हालणारे. **रद**–दांत. **नासिक** नाक. **शबरी**–एक प्रसिद्ध रामोपासक भिल्लीण. **बदरिका**-बोरी. **चरितें**–लीला. **मेजुनी**–विचार करून. **प. ९ चिकित्सक**–वैद्य. **आमयद्रुम**–रोगवृक्ष. **खाणिला**–उपटून टाकिला. **गद**–रोग. **अत्यय**—नाश. ' अत्ययाविना ' इत्यादि अन्वय. **सरुज**—रोगी. **पामर**–मूर्ख. **प्रत्यय**—खात्री, विश्वास. **प. १० क्षमी**—क्षमाशील, दयाळू. **भृगुपदाहति**–भृगुनामक ब्राह्मणभक्ताच्या पादप्रहाराचें चिह्न. **यशःकथा**—थोरवीची गोष्ट. **नव+सुधा+अनवद्य**—ताज्या अमृताप्रमाणें मधुर ' कवी तव यशःकथा पिती' इत्यादि अन्वय. **प. ११ महासुरभि**–मोठ्या कामधेनु. **रासभी**–गाढवी. **विषय**-संसारांतील घर, पैका इत्यादि मोहक वस्तु. **शुका अहारीस**–शुक्राचार्यरूप गवळ्यास. **भी**–भिते. **सदंड**–हातांत दांडकीं घेतलेले. **अदंड**-दंडरहित. या पद्यांत दंड म्हणजे निग्रहसामर्थ्य समजावें **प. १२ कथासुरभि**—कथारूप कामधेनु **जरठ**—वृद्ध **रस**-प्रेम, पान्हा. **भलते**–अनधिकारी, अनोळखी. **मल**–पाप, पुरीष. **सर्वथा**–मुळीच. **प. १३ ध्रुव**–उत्तानपादराजाचा प्रसिद्ध भगवद्भक्त पुत्र. **दरें** ( पांचजन्यानें ). **गल्ल** ( गाल ). **शिवुनि** ( स्पर्श करून ) ( प्रतिज्ञा ) सत्या करुनि दाविली इत्यादि अन्वय. **करांबुज**–हातांतील कमल. **मावरा**–लक्ष्मीपते ! **वर+अभय+परा**–वर आणि अभय देणाऱ्या ! **प. १४ सामर**–अमरांसह. **जगत्०**–तिन्ही लोकांच्या नमस्कारास योग्य. **प्रसादचतुर**–कृपा करण्याविषयीं कुशल. **वर**–कृतार्थ. **प. १५ विश्वास**–श्रद्धा, निष्ठा. **ध्रुव**–शाश्वत, अविनाशी. **विश्वास**–जगाला. **प्रकट**–खरोखर. 'मेरुशीं मोहरी कशी तुळितसां ? ' असा अन्वय. **प. १६ हा** उत्तरार्धांत सांगितलेला गुण. **गायक**–नामस्मरण करणारा. अधोगति ( पातालवास ). ' अधोगति ' हा शब्द श्लिष्ट आहे. **प. १७ कृपण**-दीन, अनाथ. **भट**-योद्धे. **कातर**-भित्रा. **दापिती**–दटावतात. **शरण्य**-शरण आलेल्या भक्तावर प्रसाद करणारा. **तम**–अज्ञान. **अरण्य**–(संसाररूप) अरण्य. **प. १८ श्रीपदें**–कल्याण करणारीं आणि म्हणूनच शोभाशाली अशीं पदें. **गुरूक्ति**–दशरथाचें वचन. **जानकीजीवन**-रामचंद्र. **धरासुर**–ब्राह्मण, भूदेव. धरा०–हें ' श्रीपदें ' याचें विशेषण **वनांत धांवली**–वनवास पत्करिला. **प. १९ तईं**–रामावतारीं. **पिशापरि**–वेड्यासारखें. **हा**–हाय हाय ! **भाषणकुशल**-बोलण्यामध्यें चतुर. **हा**–कवि मोरोपंत. **प. २० टोणपी** मूर्ख. **अपथ्यरुचि**–वावड्या पदार्थांची लागली आहे चटक ज्याला तो. **रुग्ण**—रोगी. **कटुक**–कडू. **ओखदें**—औषधें. **पी**–पिईल. **प. २१ असि**–तरवार. **भागवत**—भगवद्भक्त. **यशोरस**—यशोरूप रस. **रंगती**—

रममाण होतात. **प. २२** ‘ स्तवन मधुर गमो ( परी ) हें विष ’ इत्यादि अन्वय. **माजवी**–माज आणितें. **सद्यशोमुख**–सत्कीर्तिरूप मुख. **हालाहल**—विष-विशेष. **हर**–शिव. हर केवळ हालाहल पिणारा आहे. तूं हालाहलापेक्षां जहाल असें स्तुतिविष प्राशन करणारा आहेस. ‘ याकरितां तूं बरा ’ असा अर्थ. **अमृत**—मोक्ष. **ओपिशी**—देतोस. **प. २३ अदयताख्य**—अदयता नांवाचा. **क्षण**–पळभरसुद्धां. **शरणागती**–शरण येणें. **विषय**–धन, गृह इत्यादि सांसारिक गोष्टी. **प. २४ स्वतोक०**—आपलें मूल. **कर्दमीं**—चिखलांत. **यशोदा**—नंदाची बायको, कृष्णाची आई. **तदा**—कृष्णावतारीं. **रजोमलिनकाय**—धुळीनें मळलें आहे शरीर ज्याचें असा. **अंबर**—वस्त्र. **प. २५ विटे**–विटून जातो, कंटाळतो. **दयामृतरसार्द्रधी**-दयारूप अमृत-रसानें ओली झाली आहे बुद्धि जिची अशी. **कुलकज्जल**–कुळाला काळोखी फासणारा. **किटे**–विटून जाते. **प्रसादपट**-कृपारूप वस्त्र. **परागुरु**—विद्या-गुरु किंवा बाप. **थिटे**—लांडे. **ऋण**—कर्ज. **जन्मदा**—जन्म देणारी, माता, आई. **प. २६ हें**—शरण जाण्याचें. **जीव**–माणूस. **घनांबु**—मेघाचें पाणी. ‘ पांखरें ( मुख ) उघडिल्याविना ’ इत्यादि अन्वय. **प. २७ बर्हि**—मोर. **हें**—दृश्य जगत्. **आधि**—मनाची चिंता. **परिभ्रमे**—गरगर फिरते. **प. २८ कृतांत**—यम. **कटक**—सैन्य. **अमल**-पांढरी. **ध्वज**—पताका, निशाण. **कृतांत०**—यमाच्या सैन्याची पांढरी सफेत पताकाच अशी (जरा). **पुरःसर**–पुढें येणाऱ्या. **गद**–रोग. **तनु**–शरीर. **आगळा**–अधिक. **स्वरिपु**—माझा शत्रु, षडरिवर्ग. **प. २९ कलंक**—मळ, जाड्य. **विषय**–संसारांतील धन, गृह, इतर सुखाचे पदार्थ इत्यादि. **सदंध्रिकमळीं**—साधूंच्या चरणकमळीं. **दडो**–आश्रय घेवो. **मुरडणें**—दुसरीकडे नेणें. **भवच्चरित्र**-आपली कथा किंवा गुणवर्णन. **प. ३० कुजन**-दुर्जन. **सदुक्त मार्ग**—चांगल्या माणसांनीं उपदेशिलेला मार्ग. **दुरभिमान**—वाईट गोष्टींविषयीं आग्रह, हेकेखोरपणा. **स्वतत्त्व**—आत्मस्वरूप. **दुरित**—पाप. **आत्मबोध**—स्वरूपज्ञान. **प. ३१ दयामृतघन**—दयारूप अमृताचा मेघ. **मयूर**—मोरोपंत. **शिशु**-मूल. **कडे**-कडेवर. **अतिथि**–पाहुणा, भक्त. **असा**–माझ्यासारखा, पंतासारखा. धार्मिक-**स्तुतपद**–साधूंनीं स्तविलीं आहेत पदें ज्याचीं असा. ‘ दासा भवार्णवीं उत-रितां तुम्हां जड न पडे ’ असा अन्वय. **भवार्णव**–संसाररूप समुद्र. **उतरणें**-तारून नेणें.

———